श्री

# शांकरदिग्जयनाटक

हें

बळवंत पांडुरंग ऊर्फ अण्णासाहेब किर्लोस्कर

संगित शांकुतल, सौभद्र व रामराज्यवियोग यांचेकर्ते

यांनीं केलें

त्यांची दुसरी आवृत्ती

मालकांच्या परवानगीनें,

गजानन चिंत्तामण देव

यानीं.

पुणें येथें

"श्रीशेतकरी" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केले

प्रती १०००

सन १८९४

किंमत १॥ रुपाया.

# समर्पण.

## श्री

श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्यवर्यपदवाक्यप्रमाणपारावारपारीण यमनियमासनप्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टांगयोगानुष्ठाननिष्ठतपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्नगुरुपरंपराप्राप्तषड्दर्शनसंस्थापनाचार्य व्याख्यानसिंहासनाधीश्वर सकलनिगमागमसारहृदय सांख्यत्रयप्रतिपादकवैदिकमार्गप्रवर्तकसर्वतंत्रस्वतंत्र श्रीमहाराजधानी श्रीमद्राजाधिराजगुरुभूमंडलाचार्य ऋष्यशृंगपुरवराधीश्वरतुंगभद्रातीरवासकमलानिकेतन करवीरसिंहासनाधीश्वर श्रीमत्शंकरभगवत्पादजानुवीजनित श्रीविद्याशंकरपादपद्माराधक श्रीविद्यानरसिंहभारथी स्वामी जगद्गुरु यांचे पादकमलीं हा ग्रंथ अत्यादरें ग्रंथकर्त्यानें अर्पण केला आहे.

ग्रंथकर्ता

ब० पां० किर्लोस्कर.

---

श्रीजगद्गुरु यांनीं ग्रंथकर्त्यास दिलेलें मानपत्र—

# श्रीशंकर

श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्य
श्रीऋष्यशृंगपुरषड्दर्शनसंस्थापक
श्रीकमलानिकेतकरवीरसिंहासनेश्वर
श्रीमच्छंकराचार्यान्वयसंजाताभिनव
श्रीविद्याशंकरभारथीस्वामिकरकंजोद्भव
श्रीविद्यानरसिंहभारथीस्वामी
जगद्गुरु यांचे सन्निधानाहून

शांकरदिग्जयनाटक हा ग्रंथ रा० बळवंत पांडुरंग ऊर्फ अण्णा किर्लोस्कर यांनीं स्वकपोलकल्पित करून संस्थान देवतेपुढें वाचून दाखविला. या ग्रंथांत कथेचीवगैरे विसंगती न होऊं देतां सर्व रस साधावे तसे साधले आहेत. व हा ग्रंथ ऐकून संस्थानदेवतेस फारच आनंद जाहाला. या लहानशा ग्रंथावरून सर्व लोकांस संस्थानदेवतेच्या मूळ कथेची चांगली माहिती होईल. वास्तव सर्व लोकांनीं या ग्रंथास आश्रय दिल्यास संस्थान देवतेस संतोष होऊन त्यांनीं संस्थान देवतेची चांगली सेवा केली असें समजूं. मिती आश्वीन शुद्ध १२ शके १७९५ श्रीमुखनामसंवत्सर. महानुशासनधरावर्ति.

---

# ग्रंथकर्त्यांची प्रस्तावना.

आलीकडे विद्येचा प्रसार झाल्या पासून मोठमोठ्या विद्वानांनीं अनेक भाषांत कादंबऱ्या, नाटकें, देशाचे इतिहास इत्यादि अनेक ग्रंथ केले आहेत. व कित्येकांचे ते करण्याचे प्रयत्नही चालले आहेत. परंतु, फार थोडयां काळांत घडलेली जी गोष्ट व जेणेकरून धर्मसंबंधीं या भरतखंडांत मोठाच फेरफार झाला व नास्तिकेट्टनपटलाच्छादित चो वेदांत सहस्ररश्मि त्याचा उदय झाला, असाजो श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य श्रीमच्छंकराचार्यभारथी यांचा इतिहास, त्याविषयीं सर्व लोकांत कळण्यासारिख्या एखाद्या ग्रंथाची अवश्यकता असून तशा मासल्याचा ग्रंथ मुळींच झाला नाहीं, म्हणून मी मोठ्या मेहनतीनें ह्या चरित्राचें नाटकरूपानें वर्णन करण्यास आरंभ केला आहे.

प्रियवाचकहो, माझा ग्रंथ करण्याचा हा प्रथमप्रयत्न असल्यामुळें त्यातील न्यूनाधिक्य फारसें मनांत न आणितां गुणच ग्रहण करून माझ्या श्रमाचें सार्थक कराल अशी मोठी अशा धरून तुह्मांपुढें हा ग्रंथ ठेवितों.

आतां ह्या ग्रंथाचें नाटकरूपानें वर्णन करण्याचें हेंच मुख्य कारण आहे कीं, तशाप्रकारच्या वर्णनांतून शृंगारादि रस येतात त्यामुळें अनेक जनांस त्याची गोडी लागून त्यांतील मुख्य जो आचार्यांचा इतिहास तोहि प्रसिद्धीस येईल. ह्यास उदाहरण, एखाद्या मुलास औषध देण्याचें असल्यास त्यास शेवटीं कांहीं खडीसाखर देतों असें दाखविलें असतां, तो जसा त्या गोडाच्या आशेनें तें औषध घेऊन रोगमुक्त होतो तद्वत ह्यांतील नवरसांच्या आशेनें तरि लोकांनीं त्या परममंगलाचें रमणीय चरित्र ऐकावें, अशा उद्देशानें हे माझे श्रम आहेत.

मित्रहो, ज्यांणीं आमच्या धर्मांचें पुनर्जीवन करून सर्व चातुर्वर्णास योग्य मार्ग दाखविला, व ज्यांस आम्हीं आमचे परम पवित्र गुरू मानितों, अशा त्यां श्रीशंकराचार्यांची साद्यंत कथा माहित नसणें हें मोठें लाजिरवाणें नव्हें काय ? त्या जगद्गुरु आचार्यांच्या चरित्रवर्णनाचें कांहीं संस्कृतांत ग्रंथ आहेत, परंतु, ते एका कोपऱ्यांत पडल्यामुळें त्या सद्गुरूच्या चरित्राचें यथार्थ ज्ञान फारच थोड्या लोकांस आहे. पंडितहो, ही गोष्ट अर्वाचीन काळांत घडलेली असून, त्याबद्दल संस्कृतांत ग्रंथ असून, त्यांस आम्हीं जगद्गुरु मानीत असून त्यांच्या पीठावर शिष्यपरंपरेनें अनेक शिष्यवर्ग येत असून, आह्मांवर ते धर्मसंबंधी निग्रहानुग्रह करीत असून, त्यांची पूर्ण कथा माहित नसणें, हें मोठमोठ्या विद्वानांस योग्य आहे काय ? पहा कितीएक लोक त्या आमच्या आचार्यास विधवापुत्र ह्मणतात; कितीएक मंडनमिश्रास जैन असें म्हणतात; कितीएक आचार्यास सरस्वती शाप आहे, असें म्हणतात; असे अनेक कुतर्क त्यांचा खरा इतिहास माहित नसल्यामुळें मोठमोठे लोक करितात; तर ही मोठी दुःखाची गोष्ट नव्हे काय ! असो. ह्या सर्व अडचणी दूर व्हाव्या म्हणून मी ह्या ग्रंथास आरंभ केला आहे.

आचार्यांचें चरित्रवर्णन, सदानंद, आनंगिरा, आणि विद्यारण्य या तिघांनीं निरनिराळें केलें आहे. परंतु, आनंदगिराचार्यांनीं केलेला जो ग्रंथ तो वाक्यरूप असून मोठा विस्तीर्ण आहे असें ऐकिलें; पण तो मला पहाण्यास मिळाला नाहीं. आणि बाकीचे जे दोन ग्रंथ ते परस्पर सारख्या वर्णनाचे असल्यामुळें श्रीसदानंद स्वामिकृत जो शंकरविजय नामक ग्रंथ त्याचे अधारें मी हें नाटक लिहिलें आहें.

नाटक हें गद्यपद्यात्मक असणे योग्य आहे. परंतु मी ह्या ग्रंथ

केवळ वाक्यरूपें करण्याचें कारण हेंच कीं, पद्यें हीं कवीच्या वक्रदृष्टीमुळें आणि दूरान्वयामुळें, केव्हां केव्हां फार कठीण होतात. याकरितां त्यांतील अर्थ सर्वांस समजणार नाहीं, व कथा विच्छेद होईल, व कवितेंत वर्णन केलेला अर्थ पुनः गद्यांत आणिल्यास ज्यांस ती कविता समजेल त्यांस द्विरुक्ति वाटेल; इत्यादि भीतीमुळें आरंभीं दोन श्लोक घालून बाकीचा सर्व ग्रंथ वाक्यरूपानें लिहिला आहे. आतां या ग्रंथांत आचार्यांच्या व मंडनमिश्राच्या वादांत श्लोक घातले आहेत, ते त्यांच्याच मुखांतून निघालेले आहेत असें कित्येक पंडित ह्मणतात, कारण त्यांचे जे निरनिराळे संस्कृतग्रंथ आहेत, त्यांतही, तेच श्लोक सारिखे आढळतात, म्हणून मींहीं माझ्या या ग्रंथांत ते श्लोक जशाचे तसेच घेऊन त्यांच्या स्पष्टीकरणार्थ त्या त्या पात्रांच्या मुखें मराठींत अर्थ बोलविला आहे.

सुज्ञहो, हा ग्रंथ तयार झाल्यावर विद्वानांस दाखवून चांगला शुद्ध करण्यास मला अवकाश न मिळाल्यानें, व कंपाझीटर लोकांच हस्तदोषानें कांहीं चुका राहिल्या आहेत त्या बद्दल क्षमा करून यास उदार आश्रय द्यावा. दुसऱ्या आवृत्तींत दोषरहित ग्रंथ तयार करण्याची उमेद आहे; परंतु ती सर्व तुमच्या आश्रयावर अवलंबून आहे. तर यास चांगलें साहाय्य होऊन दुसरी आवृत्ती निघेल असें उत्तेजन तुह्मांकडून मिळावें हीच प्रार्थना आहे.

बं० पां० किं०

ग्रं० क०

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

सदरहू ग्रंथाच्या प्रथमावृत्तीच्या सर्व प्रती संपून आज पुष्कळ वर्षे झाली. व पुष्कळ लोकांकडून तिच्या विषयीं मागण्या येऊं लागल्या ह्मणून मालकांच्या परवानगीनें ही दुसरी आवृत्ति काढली आहे हिलाही प्रियवाचक पूर्वावृत्तीप्रमाणेंच आश्रय देतील अशी आशा आहे.

पुस्तक प्रकाशक.

**गजानन चिंतामण देव.**

# अंक १.

## येणारी पात्रें.

| | | |
|---|---|---|
| १ | सूत्रधार | नाटकाध्यक्ष |
| २ | विदूषक | त्याचा सोबती |
| ३ | कुबेर | इत्यादि देव |
| ४ | यम | |
| ५ | अग्नि | |
| ६ | वरुण | |
| ७ | सूर्य | |
| ८ | चंद्र | |
| ९ | इंद्र | |
| १० | ब्रह्मदेव | |
| ११ | दूत | देवदूत |
| १२ | शंकर | श्रीकैलासनाथ |
| १३ | पार्वती | त्यांची स्त्री |
| १४ | गजानन | त्यांचे पुत्र |
| १५ | षणमुख | |

श्रीशंकर

# शांकरदिग्जयनाटक.

---

(प्रथमतः सर्व संगीतकार येऊन तत्कालीनरागादिकें करून गायन करितात नंतर पुष्पांजली धारण करून सूत्रधार पडद्याबाहेर येतो.

## ॥ नांदी ॥

॥ शिरीं गंगा माथां प्रलयदहनी भाळ नयनीं ॥
॥ धरी अर्धांगीं जो भवर विषकंठीं निशिदिनीं ॥
॥ जगाचे उत्पत्तिस्थितिलय यदाज्ञेंच घडती ॥
॥ तुह्मातें तो देऊ अमितसुख माझा पशुपती ॥ १ ॥

सूत्रधार—अहो जगत्सर्गस्थितिनिरोध अनायासें निमिषार्धांत करणारा परमेश्वर तुह्मां सर्वांस सुखसंपत्ति देऊन तुमच्या अज्ञानातें नाश करो. (पुष्पांजली उडावितो.) अहो, विद्वन्मणिमुकुटसरस्वतिप्राणवल्लभ, विद्या कमलरस लोलुप, मधुकर, महापंडितसभासदहो, तुमच्या गुणग्राहक कीर्तीनें मला या प्रसन्नदर्शन सभेपुढें ओढून आणिलें आहे; तेव्हां तुमच्या कृपाकटाक्षबलें, कवीनें जसें संविधानक करून मला पढविलें आहे त्याप्रमाणें तुह्मांपुढें त्याचा अभिनय करून दाखवावा असें माझ्या मनांत आहे तरी उत्तेजन देणाऱ्या आशिर्वादासह आज्ञा असावी.

( इतक्यांत विचित्र वेषधारी विदूषक येतो. )

**विदूषक**—( आपल्याशीच )–कायतरी करावें या संसारांत काळजी आहे ह्मणून जे मी उद्यां ऐकिलें तें खरें. कायहो करावें या बेट्या मांजराच्या संगतीनें माझे सर्व उंदीर विघडून गेले अशीजर एकामागूनएक संकटें येत चालली तर मनुष्यानें संसारतरी करावा कसा! असो बरीच आठवणझाली. कोणहो ते झाईस गाड्याचें चाक अडकवून, गळ्यांत लट्ठ साप घालून. जलोदर झालेल्या दोंदिल पोटावर हात फिरवीत, मसणवटींतल्या भुतांचे आर्जव केल्याप्रमाणें, गुराच्या पाठीवरल्याक्षतांस टोंचावयास जसे कावळे जमतात तसे जमलेल्या लोकांस कशाकरितां हा आज्ञा करितो !

**सूत्रधार**—कायतरी चमत्कार, असें असंबद्ध बोलणारा अकलेचा निधी हा कोण असावा बरें! मोठ्या उल्हासानें पतिगृहीं जाणाऱ्या नवीन तरुणीपुढें मांजर आडवें गेल्या प्रमाणें सांप्रत या पुरुषानें मला अपशकून केला, तर याच्या निरसनार्थ काय बरें उपाय करावा.

**विदूषक**—अहो असेंकाय जागृदवस्थेंत बरळल्या प्रमाणें बडबडतां मी विचारतों याचा जबाब तरी या नाहींपेक्षां कोल्ह्यास पाहून शेपटींत मानघालून सिंहा प्रमाणें पळत तरी सुटा असें वाचाळ सारिखे गप्प कां रहातां!

**सूत्रधार**—काय तरी अरिष्ट हें ! काय हा वाण्यालंकार! काय हा बुद्धी ! एंकूण " बहुरत्नावसुंधरा " ही जी सुभाषितोक्ति आहे ती खोटी नव्हे. हे प्रभो तुझें सामर्थ्य अगाध आहे. अरे बाबा तूं तरुण दंपत्यांच्या रतींत मोडक्या मंचका प्रमाणें विघ्न करणारा कोण आहेस !

**विदूषक**—कोणआहे याचीच का भ्रांती! अहो गडबडाचार्यी बाण्यास अलंकार कोठचे! तुमच्या या भलत्या सलत्या भाषणानें माझ्या डोळ्यांस कानठिळ्या बसतात अहो मी या सभेचा वकील आहे बरें काय!

**सूत्रधार**—वाहवा एकूण आतां हे सभासद असल्या दिवट्या वकीलाच्या द्वारें मला आशिर्वादपूर्वक नाटक करण्यास आज्ञा देणार काय! तर मग माझें भाग्यच उदयास आलें.

**विदूषक**—एकूण यानीं आमचें स्वरूपतर ओळखीलेंच; काय हो मी बोलतां याचा अर्थ न समजल्यामुळें व्याघ्रचर्म धारण करणाऱ्या गर्धभाचें स्वरूप जाणण्यास जसें जड पडतें तसें तुह्मांस होत असेल. असो–अहो बुवा तुह्मांस येथें जें करावयाचें तें करण्यास या सभासदांची पूर्ण आज्ञा आहे. पण अगोदर काय करणार तें सांगा मग त्या सारखी आज्ञा.

**सूत्रधार**—अरे बाबा अता शुद्धीवर येऊन जर बोललास तर सर्व सांगतों, पण घटकाभर तुझ्या या वाक्पांडित्यास गवसणी अडकीव.

**विदूषक**—ही अडकाविली बोला. (दोन्ही ह्यातांनीं तोंड दाबून धरितो.)

**सूत्रधार**—अरे असें काय करतोस तशानें श्वासोश्वास बंद होऊन भलतेंच होईल आणि सर्वच राहील.

**विदूषक**—काय दुतोंडी तुह्मी आहातहो कितीतरी आह्मांस तसदी देतां सांगा सांगा लवकर, तुह्मी जे करणार त्यांत तो तुमचा " ताकडधों " " हाणीहू " हेंमात्र उपयोगीनाहीं, कारण हें पाहून पाहून आमचे सभासद दमून गेले आहेत.

**सूत्रधार**—शाबास ठीक सांगितलेंस ह्मणूनच आमच्या कवीनें धर्मशास्त्रास फार चुकूं न देतां, व लोकांच्या इच्छींच्या

हवीस योग्य, व मूळ कथेच्या संदर्भास विसंगति न होऊं देतां शंकरदिग्जयनाटक म्हणून नवीनच निर्मिलें आहे. त्याचा मी खेळ करून दाखविणार. ज्यांत शृंगार, वीर, भक्ति, हास्य आदि करून रस चांगले साधलें असून, अज्ञानांत बुडणाऱ्या भरतखंडास ज्ञानोपदेश करून, चातुर्वर्णाश्रम धर्म स्थापन करून, जगद्गुरुत्वपद श्रीशंकराचार्यांनीं कसें मिळविलें, ही कथा वर्णिली आहे.

विदूषक—बरें पण त्या कवीचें नांव तरी सांगा.

सूत्रधार—हो हो सांगण्यास काय हरकत आहे ज्यांच्या योगें आह्मीं चरितार्थ करितों त्याचें नांव सांगण्यास माझ्या वाणीस सहज स्फूर्ती येतेच ऐक.

॥ श्लोक ॥

ब्राह्मणकुलोत्पन्नः पांडुरंग सुतःसुधीः ॥
अकरोंनाटकंत्वेतद्बळवन्ताभिधःकविः ॥ १ ॥

विदूषक—तें असो हो अगोदर दोन फाकडशा लावण्या एकवा बरें म्हणजे खिशांत जें असेल तें तुम्हांस बक्षीस करीन. ( खिशांत हात घालितो व एक चिंधुक काढितो. )

सूत्रधार—अरे तूं मला गाण्यास सांगतोस पण ही वेळ नव्हे. कारण, पहा ते सर्व देव दीनमुखेंकरून महेंद्रास आपलीं संकटें सांगण्याकरितां काळजीनें बाहेरही सोडून, एका मागून एक येताहेत यावरून त्यांस महत्संकट असावेंसें वाटतें तर आम्ही या वेळीं गायनादि विषयानंद सोडिले पाहिजेत. ( असें म्हणून दोघे निघून जातात. ) ही प्रस्तावना झाली.

# अंक १



## प्रवेश १

### स्थळ—स्वर्ग लोकांतील इंद्रसभा.

तदनंतर अष्टदिक्पालादिक देवता स्मितवदनें कहून येऊन बसतात.

कुबेर—मित्रहो, या सुधर्मासभेंत कालच्या संकेताप्रमाणें आम्ही सर्वत्र तर जमलों. परंतु अद्याप महाराज शचीरमण कां येत नाहींत!

यम—मी पूर्वीच वर्तमान आणविलें त्या वरून त्रिदशपति प्रस्तुतच्या कार्याची विचारणा करण्याकरितां गुरुवर्य गीष्पति या समावेत नंदन वनांतील गुप्त मंडपांत मसलत करीत बसले आहेत असें कळलें. या करितांच राजाधिराजाची स्वारी येण्यास विलंब झाला असावा असें वाटतें.

अग्नि—हें जुळतें खरें, परंतु सर्व देवता येऊन मार्गप्रतिक्षा करिताहेत असें तिकडे सांगून पाठविण्यास कांहीं प्रत्यवाय आहे कीं काय!

वरुण—प्रत्यवाय म्हणून काय विचारतां! गुरुसहवर्तमान गुप्त मंडपांत महाराज एकांत करित असतांना आज्ञेवांचून पवनाचीही जेथें जाण्यास छाती नाहीं तेथें दुसरा जाऊन कोण हें वर्तमान सांगणार!

सूर्य—वास्तवीक. अहो पण इतका अधिक प्रसंग करण्याचें

आपणांस काय कारण आहे दोन घटका वाट पाहिली ह्मणोन थुडालें काय !

( इतक्यांत चंद्र येतो. )

**कुबेर**--ठीक ठीक. या रोहिणीवल्लभ असे; यांना मात्र तिकडील विशेष समजलें असेल. कांहो निशानाथ, सरकाराकडील वर्तमान कांहीं तुह्मांस समजलें आहे काय?

**चंद्र**--हो हो समजलें आहे. प्रस्तुत आह्मां सर्वत्रांवर जें संकट आहे त्याबद्दल काय करावें एतद्विषयीं विचार गुरुसहवर्तमान एकांतीं चालला होता, इतक्यांत तेथें सृष्टिकर्ते महाराज आले आहेत असें मी इकडे येतां येतां सुलक्षण नामक द्वारपालानें सांगितलें व मी तसाच इकडे निघून आलों.

**यम**—अरे व: एकूण पितामहाचीही स्वारी आली अं! आतां मित्रहो तिलप्राय काळजी करूं नका, दुःखाचें निःशेष मोचन झालें असें समजाच.

( इतक्यांत पडद्यांत शब्द होतो. )

[ सकलदेवतासार्वभौमश्चंडदोर्दंडबलखंडितराक्षसश्री विलापभरितधाराधरकुहरोवज्रधर: चतुर्मुखेनसहगच्छतीतिसर्वैराचारः कर्तव्य: शनैः शनश्चलतु महाराजः ]

**दूत**—( धांवत येऊन ) महाराज सरकार आले.

( सर्व उठून उभे राहतात. )

( तदनंतर महेंद्र व ब्रम्हदेव येऊन आसनावर बसतात, त्यांस सर्व देवता अनुक्रमें अभिवादन करितात. )

**इंद्र**—बसा देवतेनो बसा [ सर्व आपापल्या जाग्यावर बसतात. ] मित्रहो तुमच्या संकटाचा परिहार व्हावा म्हणून साक्षात

जगदुत्पादक देखील स्वतः श्रम घेण्यास तयार झाले आहेत. व पुढे कर्तव्य काय हेंहि त्यांनीं मला आज्ञापिलें आहे.

**वरुण**--अमरनाथ थोरांचे अवतार परोपकारार्थच आहेत. तस्मात् कमलासन महाराज आह्मांकरितां जें करितात तें योग्यच आहे. परंतु विरिंचींची कोणचा उपाय करण्याविषयीं आज्ञा झाली आहे हें ऐकण्यास सर्व देवता उत्कंठीत झाल्या आहेत.

**ब्रह्मदेव**--हे अदितिकुमारानों तुमचीं हीं म्लान कमला प्रमाणें वदनें माझ्यानें कधीं पाहवणार नाहींत; तस्मात् हें संकट कैलासीं जाऊन पार्वतीवल्लभास श्रुत केल्यावांचून निवारण होणें नाहीं अतएव तुह्मी सर्वत्रांनीं त्या उद्योगास लागावें; खचितच त्यांत कार्यसिद्धी आहे.

**इंद्र**०--पण महाराज आपणही आमच्याबरोबर आलें पाहिजे कारण मोठ्यांचा आश्रय करून गेल्याशिवाय थोरापाशीं दाद लागणें नाहीं.

**ब्रम्हदेव**-अवश्य. मी तर येणारच, त्या भोलानाथाचें प्रत्यक्ष दर्शन घेऊन मलाही फार दिवस झाले आहेत.

**इंद्र**--मित्रहो, मग विलंब कां, सर्वत्रांनीं कैलासपर्वतीं चलावें.

**सर्व**--हे आम्हीं तयार आहोंत. ( असें ह्मणून निघून जातात. )

## प्रवेश २ रा

### स्थळ--कैलास पर्वत.

**नदनंतर आसनस्थ श्रीशंकर, पार्वती, गजानन, षण्मुख यासह प्रवेश करितात. )**

पार्वती—अहो मच्चित्तकमलराजहंस, आपण मजशीं, व या उभय बालकांशीं सप्रेम भाषण करीतअसतां एकाएकी उद्विग्न होऊन दीर्घ उष्णश्वास सोडितां हें पाहून मला बाई फार भीति वाटते तर त्या मेल्या त्रिपुरासुरासारिखा कोणी एखादा दैत्य उत्पन्न होऊन देवादिकांस त्रास देत नाहींना!

शंकर—हे मत्प्राणशरचंद्रिके गिरिजे तुझें हें पतिहृद्गत जाणण्याचें चातुर्य पाहून मला फार समाधान होतें. प्रिये हिमाचलकन्ये काय सांगू ( असें म्हणून तिच्या हनुवटीस हात लावितात. )

पार्वती—आर्यपुत्र, स्त्रीजातीस मुलविण्यास जो सुलभोपाय तो करून आपलें हृद्गत न सांगण्याची ही आपली अपूर्व शैली आहेच. परंतु काय संकट आहे हें समजल्यावाचून मी आपणाशीं बोलणारच नाहीं.

शंकर—हे हृदयंगमे इतकी रागाऊं नकोस त्वत्प्रीत्यर्थ मी आपलें तुला अर्धांगही दिलें, मग हें सांगणार नाहीं काय?

पार्वती—हें काय बाई, सांगायचें असेल तर सांगावें, उगीच तोंडावरून हात फिरविण्याच्या गोष्टीनें का या पर्वतकन्येला द्रव येणार आहे? मी इतका हट्ट घेतेंना, परंतु मेला कुणी मरी उत्पन्न झाला असला म्हणजे कठीण. त्या भस्मासुरानें ( इतकें म्हणून डोळे हातानें झाकून ) नकोग बाई त्या बोहाळ्याचें नांव घेतलें कीं आंगावर काटाच येतो.

शंकर—बरें तर सांगितलें म्हणजे मग राग नाहींना? तूं ज्या करितां भितेस तसलें कांहीं नाहीं परंतु कांहीं दिवस मला मृत्युलोकीं अवतार घेतला पाहिजे. कारण भूलोकीं अनाचार फारच होत आहे.

पार्वती—असंच का मग मला ही ध्यावा लागेलच कारण पूर्वी आपण मार्तंडावतार घेतला त्या वेळीं मला म्हाळसा व्हावें लागलें.

शंकर--छे; छे, या अवतारीं तुझें कांहीं प्रयोजन नाहीं, ज्ञानमार्गस्थापना करण्याकरितां मला सन्यासी झालें पाहिजे मग स्त्रियांचे तेथें काय काम आहे !

पार्वती—असं काय ! हें बाई मला ठाउक नव्हतं. आतां आपण संन्यासी कां होणार ! मला वाटतं, सुभद्रेला पळऊन नेण्यास अर्जुनानें घेतलेल्या संन्यासवेषा प्रमाणेंच आपला संन्यास असेल. ठिक ठिक तर बरीच मौज मला पहावयास मिळेल.

शंकर--मौज म्हणून काय विचारतेस, या अवतारीं मोंठें वाग्युद्ध होणार व मोठमोठया वाद्यांस जिंकावें लागणार व तुला प्रिय जो अद्वैत मार्ग, त्याची चर्चा मूलोकीं फारच होणार.

पार्वती—पण असे अनाचार करणार कोणते हें नाहींका मला सांगायचं !

शंकर—हो हो नाहीं असें कोणीं म्हटलं.

पार्वती—मग उशीर कां सांगावं तर.

शंकर—स्वत: सांगण्याचे श्रम कशाला पाहिजेत. सर्व तुला प्रत्यक्ष समजेल. हे पहा चतुर्मुखास पुढें करून इंद्रादिक देव याच करितां येताहेत त्यांच्या मुखें तूं सर्व ऐकशील ( तदनंतर सर्व देव येऊन सांष्टांग प्रणिपात करून हात जोडून उभे रहातात. )

शंकर—बसा, सर्व देवतेनो बसा; हे मित्रा कमलासना असे यावे. ( सर्व यथायोग्य स्थानीं बसतात. ) कां विरिंचे आज या सकलदेवतेसह किंनिमित्त आगमन ?

ब्रम्हदेव—मो कैलासनाथ, त्रिकालज्ञ आपण असा प्रश्न करितां हेंच आश्चर्य बरें आमच्या मुखेंच जर ऐकण्याची इच्छा असेल तर हा देवेंद्र सर्व सांगतो, हें ऐकावें.

इंद्र—( पुढें होऊन ) मो भक्तकल्पद्रुम, सुरासुरगुरो देवतेचें

जेणें करून हित होईल तें आपण अहर्निश मनन करीतच असतां; परंतु संकट इतकेंच आहे. महाविष्णूनीं जैनाची वंचना व्हावी म्हणून बोध्यावतार धारण करून नास्तिक मत निर्माण केलें आहे. त्या मतास अवलंबन करून बौध्ध मोठे उन्मत्त होत्साते अनादि चालत आलेल्या वेदमार्गाची हेलना करितात. श्रौतमार्ग सर्व उच्छिन्न जाहाले. ब्राम्हण ही स्नान संध्यादि षट्कर्में सोडून त्याच मताचा आश्रय करूं लागले. फार काय सांगू सूर्यनारायणास नित्य एकही अर्घ्य न मिळण्याचा समय आला. जे राजे सांप्रत काळीं भूलोकीं राज्य करिताहेत तेही त्याच मतात उत्तेजन येण्यास कारण होताहेत. तसेच ते बौध्धही महान् पंडित जाहले. गीर्वाण भाषेत मोठमोठे ग्रंथ करून ते वेदमार्गाचें खंडन करितात. बौध्ध, कापालिक, दिगंबर, असे अनेक नास्तिक मार्ग उत्पन्न होऊन श्रौतमार्ग तर मुळींच बंद जाहला; मग ज्ञान, वैराग्य, निष्ठा, यांची वार्ता तरी भूलोकीं कोणास ठाऊक असेल हें मनांत सुद्धां आणावयास नको. याप्रमाणें अवस्था होऊन यज्ञ यागादिक शांतिक पौष्टिक कर्मे बंद जाहाल्यावर या अनाथ देवांचें स्वर्लोकीं उपजीवन कसें व्हावें ! देवता सर्व क्षीण जाहल्या याकरितां सर्वत्र मिळून आपल्या पादकमलीं शरण आलों आहों. तर कांहीं उपाय योजून पूर्ववत् स्थिति करण्यास आदिपुरुष आपण समर्थ अहां.

( असें म्हणून नमस्कार करून स्तब्ध बसतो. )

**शंकर**—हे सुरनाथा कांहीं काळजी करूंनकोस त्यांच्या पातकाचा समूह पूर्ण जाहला आहे. त्यांस आतां त्याचें फळ लवकरच मिळणार. आज कितीएक दिवस त्याच विचारांत मी आहें. गणपती, स्कंद तशीच ही गिरिजाही मला फारच प्रिय

आहेत परंतु त्याहून ही अतिप्रिय म्हणजे जो ज्ञानमार्ग तो नष्ट करण्यास कारण होणाऱ्या बौद्धांस आतां फारदिवस राहूं देत नाहीं. पण आतांच जर मी अवतार घेऊन ज्ञान मार्गाची स्थापना करूं लागलों तर मुळींच व्हावयाची नाहीं. कारण सांप्रत सर्व प्राणी कर्मभ्रष्ट असल्यानें ज्ञानोपदेशास पात्र नाहींत; याकरितां सर्व मार्गाचा आदिम जो कर्ममार्ग तो प्रथमतः स्थापित झाला पाहिजे. यास्तव असें करावें.

**इंद्र**—कसें करावयाचें महाराज जी आज्ञा होईल तें करण्यास हे त्रयस्त्रिंशतकोटी आपले दास तयार आहेत.

**शंकर**—हे वज्रधरा, तूं सुधन्वा नामें करून त्यांच्याच कुळांत उत्पन्न व्हावें व नीतिनें राज्य करण्यास आरंभ करावा; व बौद्धांस जिंकण्याकरितां जो येईल त्यास सहाय्य करून वेद दूषकांचा नाश करावा.

**इंद्र**—आज्ञा शिरसा मान्य आहे, परंतु नीचकुळांत कसें उत्पन्न व्हावें एतद्विषयीं चिंता आहे जे प्रत्यक्ष वेदांस दूषणें देतात व ब्राह्मणाशीं स्पष्ट वैर करतात त्यांच्या संगतीनें दिवस तरी कसे काढावे ?

**शंकर**—महेंद्रा काय भलतेंच मनांत आणतोस. भूमीच्या उद्धरणार्थ महाविष्णूनीं सूकरावतार नाहींका घेतला. अरे महत्कृत्य साधण्याकरितां नीच व्यवसाय जरी केला तरी तो भूषणास्पदच होतो. कांहीं शंका न धरितां मद्वचन त्वां पाळिलेंच पाहिजें. मत्स्यावतार धरून भगवंतानें वेदांचा उद्धार करून जें श्रेय मिळविलें तें श्रेय तुला मिळणार आहे कारण हेंही वेदोध्दारार्थच आहे.

**इंद्र**—तथास्तु-महाराज आपल्या आज्ञाप्रमाणें वर्तन करण्यास हा दास निःशंक आहे.

**शंकर**—बरें. हे प्रिय बालका षण्मुखा तूं भट्टपाद नामें करून

ब्राम्हणकुलांत उत्पन्न होऊन सुधन्वा भूपतीच्या साह्यानें जैनांस जिंकून कर्म मार्गाची प्रवृत्ति करावी.

षण्मुख—पितराज्ञा अमान्य करणारास पुत्र म्हणून कोण म्हणेल तातांच्या इच्छेनुरूप वर्तन करण्यास हा बालक तयार आहे.

शंकर—अहो ब्रम्हांडघटक आपणही मंडनमिश्र नामें ब्राम्हणकुलांत उत्पन्न होऊन माझ्या पुत्रास साह्य केलें पाहिजे. व कर्ममार्गाची पूर्ण प्रवृत्ति केली पाहिजे हें कृत्य आपणावांचून करण्यास अन्य कोणीहि समर्थ नाहीं म्हणून आपणासच सांगतों.

ब्रह्मदेव—आपली आज्ञा उल्लंघन करिल असा या त्रिजगांत कोण आहे मृत्युलोकीं अवतार घेऊन कर्ममार्गाची प्रवृत्ति याज्ञ्यानें जितकी करवेल तितकी करण्यास मी तयार आहें.

शंकर—इतर सर्व देवांनीं ब्राम्हणकुलांत अंशावतार घेऊन कर्ममार्गाची प्रवृत्ति करावी.

सर्व—आज्ञेप्रमाणें करण्यास आम्हीं तयार आहोंत कोणीकडून संकटाचें निवारण झालें म्हणजे झालें.

शंकर—झालें तर याप्रमाणें सर्व व्यवस्था होऊन कर्ममार्ग पूर्ण दृढ़ीं आला म्हणजे मी शिवगुरू नामक ब्राम्हणाचे उदरीं शंकराचार्य नामें उत्पन्न होऊन, संन्यास घेऊन तुम्हांसच जिंकून, ज्ञानमार्गाची स्थापना करिन व वेद शिरोभाग जीं उपनिषदें, त्यांवर भाष्य करिन. आणि मृत्युलोकीं जगद्गुरू पीठाची स्थापना करीन. अस्तु आतां सर्वांनीं आपापल्या उद्योगास चलावें.

सर्व—आज्ञा महाराज कृपा असावी.

(असें म्हणून वंदनें करून निघून जातात.)

**अनुसंधानात्मक प्रथमांक समाप्त.**

# अंक २



## पात्रें.

---

| | | |
|---|---|---|
| १ बौद्धसिद्धांत<br>२ जीमूतवर्ष | .... .... .... | २ जिनपंडित |
| ३ मत्तमातंग | .... .... .... .... | त्याचा शिष्य |
| ४ प्रभाकर पंडित<br>५ नीलकंठ पंडित | .... .... | २ ब्राह्मण पंडित. |
| ६ सुधन्वा | .... .... .... | जैनाचा राजा (इंद्राचा अवतार) |
| ७ दुर्मुख | .... .... .... .... | त्याचा द्वारपाळ |
| ८ विजयपाल | .... .... .... .... | त्याचा प्रधान |
| ९ अमरसिंह | .... .... .... .... | जिनपंडित |
| १० भट्टपाद | .... .... | ब्राह्मण पंडित ( स्कंदाचा अवतार ) |
| ११ कविकंठपाश | ... ... ... | जिनपंडित |
| १२ सूत्रधार | .... ... ... | नाटकाध्यक्ष |
| १३ विदूषक | ... ... ... | त्याचा सोबती |





# अंक २.

## प्रवेश १.

( तदनंतर मयूरपिच्छ धारण करणारे दोन जैनपंडित प्रवेश करितात. )

**बौध्दसिध्दांत**—अर्हद्भ्यो नमोनमः अर्हद्भ्यो नमोनमः वः काय आमचा धर्म, भगवान् बौध्धाचार्यांनीं स्थापित केला आहे "नास्तिपरलोकः", ' भूतान्यवचनवंते ". " मृत्युरेव अपवर्गः ', ऋणं कृत्वा घृतं पिब " ; हीं बौध्धवचनें कर्णास किती तरी सुखंदताहेत. ज्यांत परलोक साधण्याकरितां देहक्लेश नको; मरण हाच मोक्ष एकून अशा या सुंदर वंशांत ज्यानें मला जन्म दिलें त्या अरहद्देवाचा मी कधींहीं उपकार विसरणार नाहीं. ( पुढें पाहून ) अरे हा माझा मित्र जीमूतवर्ष पंडित इकडेच येत आहे. मित्रा यावें यावें ( त्यास भेटतो. )

**जीमूतवर्ष**—( आनंदानें भेटून ) कोण बौद्धसिद्धांत काय? नमोनमः कां मित्रा खुशालना?

**बौद्धसिद्धांत**—हो; देहमात्रेकरून खुशाल.

**जीमूतवर्ष**—असल्या ह्या संदिग्ध भाषणानें आपल्या जिवलग मित्रास भीती वाटेल अशी शंका तुला आली नाहीं काय! अरे असें झालें तरी काय?

**बौद्धसिद्धांत**—अरे आतां एकशीं दोन, किती म्हणून तुला सांगूं कालच फिरला त्यास करावें काय?

**जमूतवर्ष**—अरे हेंहीं आश्चर्यच. कारण तुजसारिख्या धैर्यवान् पुरुषाच्या मुखांतून अशीं असें कदापि निघावयाचीं नाहींत. काल फिरण्यास झालें काय? हें तरी सांग.

**बौद्धसिद्धांत**—"राजा कालस्य कारणं" मित्रा हा न्याय तुला ठाऊक नाहीं काय? अरे राजाचें मन फिरतांच कालही फिरला.

**जीमूतवर्ष**—मित्रा हें कसें काय? राजा सुधन्व्याकडून काय तरी घडलें तें आधीं सांग.

**बौद्धसिद्धांत**—काय सांगू मित्रा!, त्या दुष्टाचें नाव देशील घेऊनको; अरे तो आमच्या वंशांत कुलांगार निपजला. ज्यावेळीं याचा बाप निवर्तला, आणि यास राज्याभिषेक झाला; तेव्हांच, याच्या लहानपणाच्या वर्तनावरून मीं कितीएक मित्रांपाशीं म्हटलें; कीं हा कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ होणार आहे, तेव्हां याजवर नीट दृष्टि ठेवा पण तें कुठलें आमचेंच नशीब फुटलें त्यास करावें काय?

**जीमूतवर्ष**—बर पण तो असें करितो तरी काय?

**बौद्धसिद्धांत**—काय म्हणून काय सांगू आपल्या कुल परंपरागत धर्मावर त्याची मुळींच श्रद्धा नाहीं. आमचे प्रतिस्पर्धी जे ब्राम्हण त्यांशीं सख्य करितो. आणखी त्याचें तुला एक महत्पातक सांगू काय? ज्याच्या स्मरणानें आंगावर रोमांच उभे रहातात. (वर पाहून) देवा अशा दुष्टाचे डोळे कां झाकीनास.

**जीमूतवर्ष**--मित्रा सांग, सांग, असें कोणचें दुष्कर्म राजाकडून घडलें.

**बौद्धसिद्धांत**—अरे आज दोन महिन्यामागें राजवाड्यांत एका ब्राम्हणाकडून वेदपारायण करविलें त्या भटास पुष्कळ संभावना दिली.

**जीमूतवर्ष**—( कानावर हात ठेवून ) अर्हंत, अर्हंत, अर्हंत, काय हीं घोर कृत्यें अरे दुष्टा अशा आचरणांनीं तूं या निष्कलंक राज्य पदावर टिकशील काय ?:

**बौद्धसिद्धांत**—काय सांगूं मित्रा, या काळजींत सर्व राजकुल आहे. अशा इष्टद्रोही पुरुषास करावें तरी काय ? पहा या बौद्धधर्मांत कांहीं काळजी नाहीं परंतु आह्मांस, याच्या नीच आचरणानें अहर्निश काळजी जाळीत आहे.

**जीमूतवर्ष**—बरें पण सर्वत्रांनीं मिळून त्याचा फडशा पाडण्याची तजवीज करावी कीं नाहीं ?

**बौद्धसिद्धांत**—अरे बाबा हळू बोल. अशाच मसलती मागें दोन चार वेळां झाल्या परंतु त्या दुष्ट राजानें त्या लोकांस पकडून देहांत प्रायश्चित्त दिलें.

**जीमूतवर्ष**—तर मग आतां मुळींच उपाय नाहीं असें ह्मणत जर आम्हीं सर्व बसलों तर तो दुष्ट काळें करून आमच्या या सर्व मताचा लय करून टाकील, तेव्हां यास कांहीं तरी तजवीज काढून तो कांटा काढून टाकिला पाहिजे.

**बौद्धसिद्धांत**—खरें आहे. मीं माझा पट्टशिष्य मत्तमातंग यास राजवाड्यांत कांहीं मसलतीनें पाठविलें आहे, व त्याची वाट पाहात येथें उभा आहे. तो येऊन काय सांगतो पाहावें.

( इतक्यांत मत्तमातंग नामें शिष्य येतो. )

**मत्तमातंग**—अर्हद्भ्यो नमोनमः; मी गुरूची आज्ञा घेऊन राजवाड्यांत गेलों पण गुरूजीच्या इच्छेप्रमाणें करण्यास मला संधी मिळाली नाहीं. व सांप्रतकाळीं जें मीं वर्तमान ऐकिलें आहे, तें याहून विशेष काळजी करण्यासारखें आहे.

**बौद्धसिद्धांत**—उपासका बोल बोल काय ऐकिलेंस तें जि- तकीं आतां संकटें येतील तितकीं थोडींच.

**मत्तमातंग**—आम्हास कोणी एक भट्टपाद म्हणून ब्राम्हण, नवीन वैरी उत्पन्न झाला आहे. तो सकल शास्त्रांत मोठा प्रवीण असून त्याच्या मनांतून सर्व बौद्धसिद्धांत खंडण करावयाचा आहे. असें रत्नपूरच्या पाठशाळेच्या गुरूजीचें पत्र सुवर्णप्रभ पंडितास आतां आलें. त्या ब्राम्हणाचें व राजाचें मेतकूट अति- शय जमलें आहे, असेंहीं म्हणतात. तो गुप्तवेषानें राजास एकांतीं दोन तीन वेळ येऊन भेटला, अशी दाट बातमी राजवाड्यांत आहे.

**बौद्धसिद्धांत**—घ्या, जीमूतवर्ष नवेंच हें एक. ( शिष्यास ) अरे पण तुला सांगितल्याप्रमाणें त्या दुष्टाचा शिरच्छेदकरून या- चास कीं नाहीं पुढें आम्हीं पाहून घेतलें असतें.

**मत्तमातंग**—मीहीं त्याच बेतानें गेलों. चौकीदार सोडणार नाहींत. म्हणोन शस्त्र या झग्यांत लपविलें. परंतु, त्या नीचाची मुद्रा पाहातांच, माझे हातपाय लटलट कांपूंलागले, आंगास कांपरा भरला, जिव्हा कोरडी झाली, व हातांतील शस्त्र गळून खालीं पडलें. तें त्या क्रूर राजानें पाहातांच ' अरे यास धरा हा कोणी माझा घात करण्यास आला असावा ' असें म्हणतांच मी भरधांव पळत आलों व हे चरण पाहिले.

**बौद्धसिद्धांत**—हा मूर्खा मसलत फसविलीस; बरें मसलत घालविलीस इतकेंच नाहीं, मीहीं राजाचा वहिमी झालों. कारण, त्यानें तुला माझे बरोबर पुष्कळ वेळां पाहिलें आहे. बरें असो ( जीमूतवर्षास ) मित्रा जीमूतवर्षा, माझें चित्त फार उद्विग्न

झालें आहे. तर दुसऱ्या एका मसलती करितां मी जातों. नमोनम:

**जीमूतवर्ष**—चलावें मलाहीं फार निकडीचें काम आहे, मीहीं जातों नमोनम: ( असेंम्हणून दोघेही निघूनजातात. )

## प्रवेश २

( तदनंतर दोन ब्राम्हणपंडित हातास हात धरून बोलत येतात )

**प्रभाकरपंडित**—अहो नीलकंठ पंडीत तुह्मीं काल म्हटलें कीं ' उद्ईक तुम्हास एक शुभवर्तमान सांगेन ' तेंकाय तें सांगा मला ऐकण्याची फारच उत्कंठा झाली आहे.

**नीलकंठपंडित**—अहो ऐकातर—भट्टपाद पंडित म्हणून कोणीएक अवतारी पुरूष, या दुष्ट जैनांचा मद उतरण्याकारितां ब्राम्हण कुलांतला दीपकच कीं काय असा उत्पन्न झाला आहे. आतां, थोडक्याच दिवसांत तुम्हीं ऐकालकीं, वस्तींच्या देवालयांत शिवमूर्ती विष्णुमूर्ती स्थापन झाल्या म्हणोन.

**प्रभाकरपंडित**—महोपण काय तुमची ही वेडी आशा! असें होईल म्हणून तुम्हीं कशावरून म्हणतां? व तो अवतारिक आहे म्हणण्यास निदर्शन काय?

**नीलकंठ पंडित**—त्याचा सर्व वृत्तांत तुम्हीं ऐकिल्यव र असें म्हणणार नाहीं.

**प्रभाकर पंडित**—सांगा तरी; म्हणजे—सर्व आमचें आशावन दग्ध झालें असतां, त्याच अल्पांकुराकडे दृष्टी देऊन दिवस चालवू.

**नीळकंठ पंडित**—अहो त्या महापंडितानें जैनाचा वेष घेऊन जैन शाळेंत अध्ययन करण्यास आरंभ केला. त्या शाळेंत प्रत्येक विद्यार्थ्यास वेदांवर दूषणें देऊन निबंध लिहिण्यास सांगण्याची चाल असे. त्याप्रमाणें याजवर पाळी आली असतां यानें ही दूषण देऊन निबंध लिहिला. व तो वाचीत असतां ' मी ब्राम्हण असून काय अनुचित कर्म करितों ' असें वाटून त्याच्या नेत्रांत अश्रू आले. हें पाहून ' हा जैन नव्हे ब्राम्हण आहे ' असें त्या बौध्यांनीं जाणतांच त्या नीचांनीं, त्या भट्टपाद पंडितास माडीवरून खालीं ढकलून दिलें. त्याकाळीं पडतां पडतां या महा ब्राम्हणानें ' वेद जर खरे असतील तर मला कांहीं व्हावयाचें नाहीं ' असा उच्चार केला. व त्यास कांहीं न होतां, सुरक्षित भूतलावर तो उभा राहिला पण त्यांत त्याचा एक नेत्र मात्र गेला.

**प्रभाकर पंडित**—बरें पण आपला सर्व भार त्याणें वेदांवर घातला असून त्याचा नेत्र कसा गेला.

**नीलकंठ पंडित**—त्यानें ( वेद जर खरे असतील ) अशी अनिश्चय वाणी उच्चारिली या करितां त्यास एवढेंच प्रायश्चित्त घडलें.

**प्रभाकर पंडित**—अहो परंतु, त्याला या नीच शाळेंत अध्ययन करावयाचें प्रयोजन काय ?

**नीलकंठ पंडित**—त्याला आमचीं सर्व शास्त्रें अवगत आहेतच; परंतु, जैनांचें तर खंडन करावयाचें, अणि त्यांच्या शास्त्राचें हृद्गत तर मुळींच माहित नाहीं, या करितां त्यांच्या शाळेंत अध्ययन करण्याचा व्यवसाय त्याला भाग पडला.

**प्रभाकर पंडित**—शाबास सत्पुरुषा शाबास; एकून तुम्हीं म्हणता याप्रमाणें, तो अवतारिकच असावा यांत संदेह नाहीं.

त्याशिवाय एवढें साहस करण्यास कसा समर्थ झाला असता? व अशी वेदसिद्धी कशी राहाती? बरें पण पुढलें वर्तमान काय हें ऐकण्यास अतिशय उत्कंठित माझें मन झालें आहे. त्याला माडीवरून ढकलून दिल्यावर त्या वेदप्रतिपादकानें काय करण्याचें आरंभिलें आहे?

**नीलकंठ पंडित**—त्यानें आतां असा विचार केला आहे कीं, " आपण त्या बौध्यांचा उघड शत्रु झालों; व आतां जर निराश्रित राहिलों, तर ते दुष्ट आपल्या जिवाचा घात करण्यास चुकणार नाहींत. म्हणून राजाश्रय मागून एकवार त्यांच्याशीं वादविवाद करावा, मग यश किंवा अपयश मिळणें हें ईश्वराधीन आहे."

**प्रभाकर पंडीत**— शाबास एकून गोष्ट इतक्या पल्यास आली अें? ब्राम्हण्याचा अभिमान अद्याप ईश्वरास आहे अें? मित्रा हें प्रियवर्तमान तूं आज मला सांगितलेंस, येणेकरून माझ्यानें तुला आलिंगन केल्याशिवाय राहवत नाहीं. ( असें म्हणून त्यांस आलिंगितो. )

**नीलकंठ पंडीत**— मित्रा आधीं हा चमत्कार पाहा. ( असें म्हणून पडद्याकडें दाखवितो. )

हे पहा सर्व ब्राह्मण, ज्यांत तो वेदाभिमानी महापंडीत भट्टपादश्रेष्ट नक्षत्र समूहांत शरच्चंद्राप्रमाणें शोभतो आहे. व ज्यांणीं पुस्तक भार धारण केले आहेत; असे ते राचवाडयाकडें चालले आहेत, तरि आतां काय चमत्कार होतो हें पाहण्याची संधी, आपण जाऊं देऊं नये. चला आपणहीं त्यांत मिळू–[असें झाल्यावर दोघेहीं निघून जातात. ]



## प्रवेश ३ रा

### स्थळ—राजवाडा.

[ तदनंतर आसनस्थ सुधन्वा राजा प्रवेश करितो.]

राजा—काय करूं ह्या पाखांडयांच्या संगतींतून ईश्वर मला कधीं सोडवितो हें समजत नाहीं आतां ते अधम पंडीत एकामागून एक असे येथें जमतील व दूषित वाणीनें बडबड करितील; तें माझ्यानें ऐकवणारहीं नाहीं. या सर्व समुहांत माझ्या चित्ताभिप्रायोप्रमाणें वर्तन करणारा माझा एक मंत्री मात्र आहे. ह्मणूनच त्या दुष्टांचे वाक्‌जल्प ऐकून तापलेल्या हृदयाचें समाधानं त्या प्रियभाषकाच्या बोलण्यानें होतें.

[पडद्याकडें पाहून] कोण आहेरे तिकडें?

(इतक्यांत द्वारपाल येतो.)

द्वारपाल—महाराज मी दासानुदास आहे. (असें म्हणून जमीनीस हात लावून त्रिवार मुजरा करितो.)

राजा— अरे दुर्मुखा विजयपाल प्रधानास बोलावून आण.

द्वारपाल— जी आज्ञा. (असें ह्मणून पडद्यांत जाऊन प्रधानासह प्रवेश करितो. व प्रधानास म्हणतो.) सरकार, सकलसामंतचक्रवर्तीमहाराज आज्ञा करण्याविषयीं उत्कंठित होत्साते इकडें दृष्टि देऊन बसले आहेत तरि चलावें.

प्रधान— (सिंहासनाजवळ येऊन त्रिवार मुजरा करून) महाराजांचा जयजयकार असो. सरकार, या दासानुदासाची महाराजास किमर्थ आठवण झाली.

राजा— भो प्रियमंत्रीवर्य समजून उमजून दुराचरण करणें, व स्वजन विरुद्ध आचरण करणें, हीं दोन्हीं परम दुःखदा-

येऊ आहेतच परंतु, ह्या दोन्हींचा ज्यांत अन्योन्याश्रय असतो तें कृत्य करण्याचें ज्याचे नशीबी येईल, तो प्राणी नरकवासाहून तें दुःख अतिशय मानील, असें अनुभवावरून मला वाटतें. प्रधानजी, मला सार्वभौमपद आहे गजांत लक्ष्मी आहे, अमंत प्रशनावाचून सर्व इंद्रसौख्य आहे असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं, परंतु त्या वरील दोन गोष्टींच्या कचाट्यांत सांपडल्यामुळें, मला हे आपले प्राणहीं जड झाले आहेत, औषध न पोहचलें असतां रोग जसा बळाऊन शरीरास क्षीण करितो तद्वत ही पीडा शिखरास जाऊन पोहोंचली आतां देहावसानकालींच हि मला सोडणार असें खचित वाटू लागलें आहे

**प्रभाकर पंडित**—महाराज बोलण्यास आज्ञा असावी, सरकार आपलें हें गूढ भाषण ह्या मंद मतीस स्पष्ट कळत नाहीं; तर पुनरपि एकवार तें उघड करून सांगण्याचे श्रम घ्यावेत.

**राजा**--अमात्याधीश, त्यांत गूढ तें काय? अहो श्रौ वेदबाह्य बौद्ध धर्म समजून उमजून पातकें करण्यास लावितो आणि अतिपवित्र राजनीती स्वजनाविरुद्ध आचरण करावयास लावित्ये; पहा या दोहींचीं कार्यें मज एकावरच घडत असल्या- मुळें ह्या प्राणासही कंटाळला आहे.

**प्रभाकरपंडित**--राजाधिराज, असा धीर सोडूं नये, कांच जरी हिऱ्याच्या स्थानीं पोहोंचली तरी ती तेथें फार दिवस टिकणार नाहीं, परिक्षा समयीं कांच ती कांच व हिरा तो हिरा असें होऊन जाईल. हे स्वधर्मपालक, आपण मात्र उगीच चित्तास अनुताप करून घेऊं नये.

**राजा**--असो बरीच आठवण झाली. कांयहो कोणी ब्राम्हण कुलोध्दारक भट्टपादनामेकरून उत्पन्न झाला आहे; असें रत्नपूरच्या अधिकाऱ्याकडून तुम्हांस गुप्त पत्र आ-

त्यांच तुम्हीं मला सांगितलें, त्याचें तथ्यत्वा विषयीं दुसरें कांहीं प्रमाण अढळलें आहे काय !

**प्रभाकर पंडित**—महाराज, अन्य प्रमाणें कशास पाहिजेत ते भट्टपाद श्रेष्ठ अनेक विप्रांसहवर्तमान, काल राजनगरींत येऊन शिवालयांत राहिले आहेत, आज ते राजसभेंत येणार आहेत.

**राजा**— ( मोठ्या उद्गारानें ) काय तो मत्नेत्रचकोरचंद्र येथें आला आहे.

**प्रभाकरपंडित**—वास्तवीक. मीं जेव्हां हें वर्तमान माझ्या दूत मुखें ऐकिलें तेव्हां तत्क्षणीं शिवालयांत जाऊन पाहिलें, व दृष्टींचें समाधान करून घेतलें.

**राजा**—अहो तुम्हीं धन्य, त्या माहाभागाचें दर्शन घेऊन तुह्मी पवित्र जाहालां, तसा हा अधम केव्हां होईल असें झालें आहे.

**प्रभाकरपंडित**—महाराज, सावध व्हावें, हे नित्य सभेंत येणारे जैन, कापालिक, दिगंबर, भैरवोपासक, क्षपणक, प्रभृती पडीत येताहेत.

**राजा**—जळो त्या वेददूषकांचें दर्शनहीं नको.

( इतक्यांत एकामागून एक असे पूर्वोक्त पंडित येऊन राजाचा विजय असो असें म्हणून आपापल्या स्थानांवर बसतात. )

**राजा**—( कपाळास आठी घालून ) सर्व पंडितांस मी अभिवादन करितों.

**सर्व पंडित**—उपासकास अभीष्टसिद्धी असो.

( इतक्यांत गडबडीनें द्वारपाल येतो. )

**द्वारपाल**—( त्रिवार मुजरा करून ) पृथ्वीनाथ, कांहीं

ब्राम्हण राजांगणांत येऊन उभे आहेत, व सरकारची भेट घे-ण्याची इच्छा आहे म्हणून सांगतात तर जशी आज्ञा होईल तसें करितों.

**अमरसिंहपंडित**—( मध्येंच ) राजा, ब्राह्मणाचें वेड तुझ्या कारकीर्दींत फारच पिकलें आहे, तरी हें आमच्या कुलाचारास योग्य नव्हे. याजबद्दल तुजवर बौध्धाचार्यांचा कोप होईल; या-जकरितां त्या ब्राह्मणांस सभेंत येण्याची परवानगी देऊं नये.

**राजा**—( प्रधानांकडे वळून ) कां पंत मी मघा सांगि-तलेल्या दोन्हीं गोष्टी प्रत्ययास आल्यानां ? ( पंडितांकडे वळून ) माहाराज, हें आचरण राजनीती विरुद्ध आहे; आणि, राजधर्म सर्व ज्ञातींतील राजास सारिखे आहेत. ते ब्राह्मण, कांहीं दुस-ऱ्यापासून आपणास इजा होत्ये, ती दूर करण्यास सांगण्यास येताहेत, किंवा त्यांस चोरांनीं लुटिलें ह्मणून फिर्यादीस येताहेत हें कांहींच कळत नाहीं. आतां, अशा लोकांची दाद मी घेतली नाहीं तर प्रजा लवकरच मला कंटाळेल. यास्तव अवश्य त्यांची भेट मला घेतली पाहिजे; व त्यांस योग्य जो सन्मान तोहीं दिला पाहिजे ( द्वारपाळास ) जारे त्यांस आंत घेऊन ये. ( प्रधा-नास ) अहो सचीव, त्यांस बसण्यास माझ्या सव्यांगीं कांहीं सुवर्णमंच आणवून ठेववा.

**प्रभाकर पंडित**—सर्व तयारी आहे महाराज ( असें ह्मणून आसनांची तयारी करवितो. )

( सर्व पडित दांत खाऊन चडफडत जागचे जागीं स्तब्ध बस-तात

**( इतक्यांत विप्र समूदायासह भट्टपाद पंडीत प्रवेश करितो त्यास राजा सामोरा जाऊन आसनावर आणून बसवितो )**

**राजा**—( मोठ्या आनंदानें नमन करून ) माहाराज आपल्या दर्शनें करून मी धन्याहून धन्य झालों, व या चरण धूळीनें हें माझें मस्तक पुनीत झालें.

( आंगावर रोमांच आणून ) वाहव्वा केवढा हो आनंद समय हा! सकल जगाचा उद्धार करणारी, व त्रिविध तापांचें भस्म करणारी, अशी जी गंगा, तिचा प्रवाह या आळशावर येऊन पडला काय! राजसूय, अश्वमेध, असे अनेक याग, व महान् महान् व्रतें केलीं असतांही जें दुर्मिळ फळ तें सहज याचे हातीं आलें काय! एकूण आजच्या या लाभाचें वर्णनच करितां येत नाहीं, मला वाटतें, मी अनेक जन्म सुकर्मेंकरून संचित करून ठेविल्याचा हा ठेवाच या दीनास एकदांच मिळाला, यांत संशय नाहीं. अस्तु, महाराज कोणची आज्ञा करण्याकरितां स्वत: येथपर्यंत येण्याचे श्रम घतले. हें ऐकिण्यास हा दास भुकेला आहे.

**सर्वपंडित**—( कानांवर हात ठेऊन ) अर्हन्. अर्हन्, अर्हन्, कायही भक्ति! काय ही स्तुती! अरे चांडाळा ( हात चोळून ) आमच्या समक्ष तुझें हें असें आचरण काय! ( आकाशाकडे पाहून ) भगवंता सुगता, गर्धभास पक्वान्नें चारणाऱ्या या कुलकलंक्यास नाहींसें कां करीनास.

**भट्टपाद**—राजा तूं सर्व वर्णाश्रमाचा पालनकर्ता आहेस, तेव्हां तुला पाहावें एवढीच इच्छा; आणि तशांतून कांहीं विशेष कारण असल्यास तें सहज समजेलच ( मनांत ) बरें पण हे अनेक बौद्धपंडित बसले आहेत तेव्हां त्यांच्या बरोबर कलह कोणच्या निमित्तानें काढावा; आल्या सारिखें कांहीं तरी करून गेलें पाहिजे. ( इतक्यांत कोकिळा ओरडली ते शब्द ऐकून ) व: हें निमित्त ठीक आहे. ( उघड ) शाखास कोकिळ शाखास

तुझा स्वर किती तरी कर्णास मधुर लागतो, तुझ्या ह्या अलौकिक गुणांमुळें लोकांनीं तुजवर फारच प्रीति करावी, परंतु तशी ते करीत नाहींत कारण तुला संगती नीच कावळ्याची पडली. नाहीं पक्षा, लोक राघूस जसे पिंजऱ्यांत बाळगून ठेऊन त्या समवेत आनंद करितात, तद्वत् तुलाही ठेऊन करिते. तस्मात् दुःसंगति सर्व गुणाचा नाश करून हेलना व तिरस्कृति, ह्यांस जाहिल्ये ह्यास प्रत्यक्ष उदाहरण जवळच आहे. हा सुधन्वा राजा गुणानें किती थोर आहे, मोठा दयाळू, दानशूर, सत्यप्रतिज्ञ. परंतु ह्या नीच वेददूषक बौद्धांच्या संगतीमुळें लोक याचा तिरस्कार करि-तात. ( राजास ) अरे राजा तुझ्या संगतीला हे वेदबाह्य सद्वेष्टे जैन अगदीं उपयोगाचे नाहींत. अरे महारोग जडलेली व्याधि सहन करवेल परंतु या दुष्टांचें मुख पाहिल्यापासून पीडा सहन करवणार नाहीं. अरे हे निष्कलंक राजा तुझ्या मध्यें आणि या पाप पर्वता-मध्ये महदंतर आहे. कसें जर म्हणशील तर ऐक तूं सुवर्णसाम्य आहेस; आणि हे अधम लोहसाम्य होत. हे धरानाथा तूं रत्नवत आहेस; आणि हे चांडाळ काळ्या दगडाप्रमाणें होत. तसेंच हे पुण्यशीला, तूं राजहंस सदृश आहेस, आणि हे पाखांडी काक सदृश आहेत तस्मात् कोणत्याही उपायानें तुला यांच्या संग-तीपासून दूर झालें पाहिजे.

**बौद्धसिद्धांत**—( संतापून ) अरे मिथ्यावादिन्, या राज-सभेंत अगंतुकाप्रमाणें येऊन या अप्रगल्भ राजादेखत, निष्पाप जे आम्ही त्यांची निंदा करितोस काय ? अरे ब्राम्हणाधमा, हा एवढा दुर्मद तुला कशानेंरे आला ? अरे कृतघ्ना आमच्या च शाळेंत छद्मवेषानें अध्ययन करून चोरा आह्मांवरच फिरून पड-तोस काय ? तर ह्या असंख्य पातकांचें प्रायश्चित्त अनुभविल्या-

वांचून तूं या राजसभेंतून जिवंत बाहेर पडणार नाहींस. सूर्प समज.

**भट्टपाद**—( हात अपटून ) अरे भ्रष्टा बौध्यपशो, मी तुमच्या शाळेंत अध्ययन करून तुमच्या शास्त्रांचें इंगित जाणिलें, आतां मी तुमची निंदाच करून तुह्मांस सोडिन अस वाटूं देऊंनका. या स्थळीं युक्ति कुठारीनें तुमचा सिद्धांत वृक्ष तोडून तुम्हांस जिंकून धुळीस मिळवीन तरच मी ब्राम्हण खरा. अरे आजपर्यंत जे ब्राम्हण तुह्मीं या थोतांड मतानें पराभूत केलेत, त्यांतला हा नव्हे. ( छातीस हात लाऊन ) हा बौध्यसंतान धूमकेतु भट्टपाद आहे. काय पूर्वपक्ष रडण्याचे असतील ते रड.

**कवि॰पा॰पंडित**—( पुढें सरकून ) अरे भ्रष्ट कुलसंजात ब्रम्हबंधो, तूं ज्या मताचा अभिमान धरून इतका उन्मत्त होत्साता एवढें साहस करण्यास प्रवृत्त झालास, त्यांत कोणतें सत्यत्व आहे. आंगास राख लाऊन, वनांत राहून, उपोषणें करून, वृष्टी व तापसहन करून जर मुक्ति मिळती, तर खाणें, पिणें, वर्ज करून, षड्ऋतूंतले ताप व वृष्टी सहन करणारे दगड मुळींच दिसतेना. सर्वच मुक्तीस गेले असते अरे असलें भिकारमत गृहस्थांची वंचना करून पोटें भरण्यास, तुह्मीच मनःकल्पित निर्मिलें आहे. तें पंडितमान्य कधीं तरी होईल काय ?

**भट्टपाद**—अरे नास्तिका, आमच्या मताचें तत्व न जाणतां, भलत्याचीच उपमा भलत्यास दिलीस ह्मणजे तूं मला जिंकिलें असें होईल काय ? अरे बैला, जडाची आणि चैतन्याची ऐक्यता करणाऱ्या तुला तें काय कळणार आहे. माती आणि कस्तुरी यांत काय भेद आहे. म्हणोन गर्धभास विचारिल्यास, वर्ण सादृश्यास्तव तो दोन्हीही एकच मानणार सर्वत्र, दृष्टांताला

ष्टांताशीं सर्व साम्य नसतें, हें ज्यास माहित नाहीं, तो अशा वादांत पुढें आला असतां, त्याचे दंत भग्न जाहाल्या वांचून राहाणे नाहींत, याकरितां माहामूर्खा मागें सरक.

**बौद्धसिद्धांत**—अरे पुच्छाविषाणहीनपशो, तुह्मांस गोड-खाण्याची इच्छा झाली म्हणजे श्राद्ध मिषानें पक्कानें भक्षण करितां आणि पितर तृप्त होतात ह्मणून सांगतां, हें जर खरें आहे, तर दीप शांत झाल्यावर तेल घातलें तर तो दिवा पुनः पेटावा; तसेंच मांस भक्षण करीत नाहीं असा डौल घालून ती इच्छा उत्पन्न झाली ह्मणजे यज्ञाच्या निमित्तानें हिंसा करून मांस खाता. आणि सांगताकीं " यज्ञांत मारिलेला पशूदेखील आपल्या बेचाळीस पूर्वजांसह स्वर्गास जातो. मग त्या कर्त्यास किती फळ येत असेल ? " तर पितरांस स्वर्ग देण्याकरितां जो यज्ञकरितां, त्यांत आपल्या आइबापांसच कां मारित नाहीं, ह्मणजे तेच पशूबद्दल स्वर्गास जातील व तुमचीही मांसाहाराची इच्छा पूर्ण होईल.

**भट्टपाद**—अरे असंबद्ध प्रलापिन् याबद्दल तुला मी थोड-क्यांत उत्तर देतों. सर्वांस प्रमाणभूत वेद आहेत. आणि यज्ञ, याग, जप, तप इत्यादिक सर्व साधनें तदुक्त आहेत, तस्मात् ते वेद अप्रमाण आहेत, असें सिद्ध केल्यावांचून तदुक्तकर्मे असत्य असें सिद्ध होणार नाहीं. या करितां जर आंगांत सामर्थ्य असेल तर वेद अप्रमाण आहेत असें सिद्ध कर.

**अमरसिंह**—( मध्येंच ) मित्रहो आतां गडबड करूं नका, हा भला सांपडला. आतां मी यास बौध्यमत निंदेचें काय फळ मिळतें, याचा उपदेश करितों. अरे बैला तूं जे वेद पवित्र मानितोस त्या वेदांचे मस्तकांवर लत्ताप्रहार करणारे जे आह्मी बौद्ध,

त वेद अप्रमाण म्हणण्यास भितों काय? मी साफ सांगतों, तुमचे वेद असत्यवादी आहेत. त्यांत सत्यत्व दाखीव ह्मणजे खरें.

**भट्टपाद**—अरे बौद्धशिशो, सत्यत्व तें कोणच्या प्रकारें दाखवायाचें तें सांग म्हणजे पाहूं. परंतु तूं वादरीती न सोडिली पाहिजे.

**अमरसिंह**—अरे ब्रम्हबटो, सत्यत्व म्हणजे—त्या वेदांत जो अर्थ असेल, त्याचा खरेपणा तूं प्रत्यक्ष करून दाखवावा. म्हणजे तुझा वाद खरा आहे.

**भट्टपाद**—अरे वाचाळा, वेद अनंत आहेत, त्या प्रत्येकांच्या अर्थाचा खरेपणा किंवा खोटेपणा पाहाणे म्हणजे यास असंख्य वर्षे घालविलीं पाहिजेत, मग आमच्या या वादाचा निर्णय कसा व्हावा?

**अमरसिंह**—अरे "स्थालितंडुलन्याय" म्हणजे शिजणाऱ्या भाताची शितें, सर्व कांहीं चिरडून परीक्षा करण्यास नको आहेत; एक पाहिलें म्हणजे झालें. त्याप्रमाणें तुझ्या वेदांतील एखादें वचन तरीं, सत्यार्थक आहे, असें दाखीव म्हणजे झालें.

**भट्टपाद**—( संतोष पाऊन ) असें काय? नीचानो, माझें काम झालें. ( राजास ) अरे भूपाळा, तू साक्ष आहेस पाहा यांस मी आतां जिंकितो. अरे वेददूषका नीचा बौध्यपंडिता, मी म्हणतों या श्रुतीच्या अर्थाकडे लक्ष दे.

**अमरसिंह**—दिलें, दिलें; रड आतां, कोणची श्रुती ती मला ठाऊक आहे. तुमच्या वेदनांवाच्या बडबडण्यांत इश्वरास हजार डोकीं चार हजार पाय ह्याच कथा आहेत त्यांत तुला सत्यार्थक श्रुती कोणची आढळणार आहे?

भट्टपाद--बरें तसें कां होईना ऐकतर. ( असें म्हणून श्रुतीचा उच्चार करितो. )

॥ अग्निर्हिमस्य भेषजं ॥

कारे मिथ्या जल्पका या श्रुतीचा अर्थ तुला कळला ?

अमरसिंह—मला कळण्याचें असूंदे. पण तूंच सांग, काय श्रुती बडबडत्ये ती.

भट्टपाद—अरे अधमा "अग्निः" म्हणजे वन्ही "हिमस्य" म्हणजे थंडीचें "भेषजं" म्हणजे—औषध होय. आतां सत्यत्व तूंच पाहा मनुष्यास थंडी लागली म्हणजे विस्तवापाशीं जाऊन आंग शेकल्यानें थंडी नाहींशी होते. कां वेद प्रमाणभूत असून तदुक्त सर्व धर्म खरे झाल्यानंतर त्यांस दूषण देणारे तुम्हीं दंड्य अहात किंवा नाहीं ? ( असें म्हणतांच सर्व ब्राह्मण जिंत जिंत याप्रमाणें म्हणून टाळ्या वाजवितात व मोठा गलबला कारितात. )

सर्व बौध्द—( मोठ्यानें आरडून ) अशानें निर्णय झाला नाहीं. आम्हीं सांगूं त्या श्रुतीचा याणें सत्यार्थ करून दाखवावा ( असें ह्मणून तेही मोठा कलकलाट करितात. याप्रमाणें त्या कल्होळानें सर्व सभा दणाणून गेली. )

राजा—( सर्व गलबला शांत झाल्यावर बौध्द पंडितांस ) कां पंडितहो, तुम्हीं वादांत पराभूत झालांत. ब्राम्हणांनीं तुम्हांस जिंकिलें आतां तुमच्यासह त्यांचे शिष्य होणें मला भाग आहे.

बौद्धसिद्धांत—(संतापून) अरे निर्लज्जा, काय हें बोलतोस ? एवढें हें बौध्दमत एका यःकश्चित्‌ श्रुतीनें खंडित होतें काय ? आह्मांस ती श्रुती साफ मान्य नाहीं. आह्मी काढूं त्या श्रुतिची यानें असा अर्थ करून दाखवावा.

**राजा**—( विचार करून ) हं. तें असो आतां वादाची गरज नाहीं मताच्या सत्यासत्याविषयी मी दैवी प्रमाण काढितों तें हें कीं—हा आमचा नगराजवळील पर्वत फार उंच आहे. त्यावरून उडी मारून जो शाबूत राहील, त्याचें मत खरें पाहिजे तर तुह्मी मारा, किंवा ब्राम्हण मारोत.

**सर्व बौद्ध**—( आपसांत ) कायहो, ही युक्ति राजानें बरीच काढली म्हणावयाची आतां त्यासच उडी मारायास लाऊं ह्मणजे अनाचारें दुष्ट मरून जाईल. एवढ्या पर्वतावरून पडल्यावर मनुष्य जिवंत राहाणेंच नाहीं बरें तर अमरसिंह पंडीत तुह्मींच ठरल्याप्रमाणें राजास कळवा.

**अमरसिंह पंडित**—फार बरें आहे. ( राजास ) राजाधिराज, हाच मुद्दाम आपलें मत खरें आहे ह्मणून वादार्थ आला आहे तर यानेंच उडी मारावी.

**राजा**—भो माहापंडित भट्टपादवर्य मीं सांगितलेलें दिव्य करण्यास तुह्मीं तयार आहांत काय ?

**भट्टपाद**—( उठून उभा राहून ) तयार म्हणून काय विचारतोस विलंब कां आतांच चलावें. ( असें म्हणून सर्व विप्रांसह चालूं लागतो, )

**राजा**—( गडबडीनें ) चला तर सर्वत्र पर्वताकडे. ( सर्व बौध्दही चालूं लागतात. )

( **पर्वताजवळ पोंहोंचल्यावर** )

**राजा**—हे ब्राम्हण कुलोत्तंस हाच तो पर्वत यावर चढून उडी मारून आपण जर अक्षत राहाल, तर तुमचें मत खरें आहे असें हे बौद्ध कबूल करितील.

**भट्टपाद**—फार उत्तम ( असें म्हणून पर्वतावर चढलेंत करून

उभा राहून हात जोडून ) हे वेदपुरुषा तुझ्या उद्धारार्थ मी हें साहस करितों, तर यश देणें त्वदधीन आहे. हे कैलासनाथ कृपा असावी. आतां राजानें, व या चांडाळ बौद्धांनीं, व सर्व विप्रांनीं, व जमलेल्या इतर तमासगीरांनीं माझी प्रतिज्ञा ऐकावी. ( मोठ्या स्वरानें ) जर वेद प्रमाण असतील जर हे चांडाळ अधम पातकी जैन निंद्य असतील, तर सर्व ब्राह्मण वंद्य असतील तर या पतनापासून माझ्या शरीरास कांहीं इजा होणार नाहीं. आतां सर्वत्रांनीं पाहावें. जयशंकर.

( असें म्हणून उडी मारून जमिनीवर अक्षत होत्साता उभा राहातो. )

**राजा**--( जवळ येऊन आश्चर्य मुद्रेनें पाहून ) धन्य, धन्य, भट्टपाद श्रेष्ठ. माहाराज तुमचा धर्म खरोखर सत्य आहे. ( असें म्हणून त्यास आलिंगितो. )

**काव० क० पा०**--( तापून ) राजा काय हा पोरखेळ मांडला आहेस. अशानें तूं मतनिर्णय करणार आहेत काय ? अरे मणी, मंत्र औषधी यापासून अशीं कृत्यें होऊं शकतील. उद्यां एक मल्ल येऊन याच्यापेक्षां ही उचावरून उडी मारील, म्हणून त्याचें मत खरें काय ! आम्हीं या तुझ्या पोरचेष्टेस अगदीं कबूल नाहींत.

**राजा**--( डोळे लाल करून ) अरे पंडितांनो मी आजवर तुम्हांस अवाक्षरही बोललों नाहीं; परंतु, आतां साफ सांगतो. तुम्ही माहापातकी अधम चांडाळ आहांत. तुम्हांस ही गोष्ट मान्य नव्हती तर या ब्राम्हणांस एवढें साहस करण्याचे श्रम कशाला दिलेत ? बरें मूर्खांनो तुमचा आतां निःपातच करितों. ( असें म्हणून प्रधानास बोलाऊन त्यास एकांती सांगतो. ) विजयपाल प्रधाना, मी सांगतो तें कोणास न समजूं देतां तयार करून येऊन आतांच्या आतां एळ काय ?

**प्रधान**—माहाराज यांत काय संशय. ज्या विषयीं आज्ञा होईल तें तयार करून आतांच घेऊन येतो.

**राजा**—( प्रधानाचे कानांत सांगतो. ) एका ताम्रघटांत शिकारखान्यांतील एक नागसर्प, कोणांस न समजूं देतां घालून त्या घागरांचें तोंड बांधून, ती घागर आतांच सभेंत आणा चला. उठा.

**प्रधान**—( आंत जाऊन, मुख बांधलेली घागर घेऊन पुन: प्रवेश करितो. ) माहाराज आज्ञेप्रमाणें तयार करून हा घट आणिला आहे.

**राजा**—फार उत्तम. असा मध्यें ठेवा.

( आज्ञ प्रमाणें प्रधान कलश ठेवितो. )

**राजा**—( मोठ्या स्वरानें ) आतां माझी ही शेवटची प्रतिज्ञा सर्वत्रांनीं ऐकावी. ( घागरीकडे बोट दाखऊन ) या ताम्र घटांत कांहीं वस्तु मी स्वत: गुप्तरूपें घातली आहे. ती काय आहे हें सांगावें. जो खरें सांगेल त्याचें मत मी खरें मानून जिवापेक्षांही अधिक जतन करीन. व जे खोटे ठरताल, त्यांचें बीज देखील ठेवणार नाहीं. त्यां सर्व कुळांचा नाश करून टाकीन; व या प्रतिज्ञेंत जर मजकडून अंतर होईल तर माझ्या बेचाळीस पूर्वजांसह मी नरकास जाईन. बौद्धपंडितानो आतां मात्र मी कोणाचीही तक्रार ऐकणार नाहीं. बोला बोला यांत काय आहे तें लौकर बोला.

**सर्वबौद्ध**—( आपसांत. ) आतां मात्र कठिण प्रसंग आला ही परोक्ष वस्तु, आह्मांस कशी समजावी. भो अर्हन् गुरो आतां तूंच राखणार.

**अमरसिंहपंडित**—अहो इतके पंचाइतींत कां पडतां ? माझा

मिर्त्रं संपर्णक धर्मी आहे. तो फांसे टाकून शकून पाहून, पाहिजे ती वस्तु गुप्त असली तरी सांगतो. तेव्हां राजापासून आजच्या दिवसाची फुरसत घेऊन, रात्रीं त्या वस्तूचें ज्ञान करून घेऊन, सकाळीं सांगूं ह्मणजे झालें. सांगा तर राजास असें.

**बाहु संद्धांत**—हे राजाधिराज, आपण फार संतापून, एवढी घोर प्रतिज्ञा केली आहे. तेव्हां याचा विचार केल्यावांचून आम्हांस उत्तर देतां येत नाहीं, तर कृपाकरून आजच्या दिवसाची आम्हांस अवधी यावी; म्हणजे उद्यींक या घटांत काय आहे तें सांगूं.

**राजा**—( भट्टपादाकडे वळून ) कां विप्रवर्य तुम्हाकडून या गोष्टीस कांहीं हरकत आहे काय? ते उद्यींक उत्तर देऊं म्हणतात.

**भट्टपाद**—राजन् मजकडून तिळप्राय विलंब नाहीं मी पाहिजे तर त्यांत काय आहे तें आतां सांगतों. ते उद्इंक म्हणतात तसें कां होईना. मरणास रात्र आडवी.

**राजा**—बरें चलातर. उद्यां सूर्योदया बरोबर सर्वांनीं येथें जमावें. ( प्रधानास ) अहो सचीव, उद्यां मात्र सर्व आपल्या लष्करांतील स्वार व शिपाई यांणीं तोफखान्यासुद्धां, सभा आंत भरली कीं या राजवाड्यास गराडा द्यावा; कारण कोणच्या तरी एका पक्षास देहांत प्रायश्चित मिळणारच; तेव्हां ही तयारी तुम्हीं येव्हांपासून ठेवा. ( अंमळ विचार करून ) हं, घटांतील वस्तू तुम्हावांचून दुसऱ्यास माहीत नाहीं, या करितां सांगतों, जर ती बाहेर फुटली तर तुमचा शिरच्छेद करीन. चलातर सर्व ( सर्व जातात. )

## प्रवेश ४

( तदनंतर खिन्न वदन करून रुदन करीत विदूषक येतो. )

**विदूषक**—( आपल्याशींच. ) कायहो माझें प्राक्तन्हें! बौद्धाचार्यांच्या सहवासानें राहिल्यास, जैनांच्या नग्न स्त्रियांकडून उत्तम उत्तम पक्वान्नें खावयास मिळतात. काम नाहीं धाम नाहीं वस्तीच्या देवालयांत माजलेल्या पोळा सारिख्या ढुरकण्या फोडीत मऊ गादीवर, मोराचा कुंचला फिरवीत पडत होतो. हवें तर दिवसां दोनदां जेवावें. इत्यादि सुखांस भुलून ब्राम्हणाचा जैन झालों. परंतु माझ्या फुटक्या नशीबाच्या जोरामुळें, घट्टपाद म्हणोन कोणी ब्राम्हण बौध्यांचा नि:पात करण्यास उद्युक्त झाला आहे. उदईक सर्व जैन ठार मारणार. अशी वदंता ऐकतों. तेव्हां आतां करावें तरी काय!

(इतक्यांत हंसत सूत्रधार येतो. )

**सूत्रधार**— अरे मित्रा काय झालें तरी काय! असें स्फुंदुन स्फुंदुन कशाकरितां रडतोस!

**विदूषक**— तुह्मी दैववान हो बुवा. तुह्मास मी हंसत होतों, व माझ्या सौख्याचा टेंभा तुम्हापुढें मी मिरवीत होतों; परतु, तुम्ही आपला धर्म न सोडितां ब्राम्हणच राहिलां, व मी, त्या, चिमट्यानें सर्व डोईचे केंस उपटून घेणाऱ्या थेरड्याच्या म्हणण्यास भुलून या लचांडांत सांपडलों. ( असें म्हणून अधीकच रूदन करूं लागतो. )

**सूत्रधार**—अरे पण तू असा घाबरलास कां! रूदन करण्यापर्यंत असा तुजवर कोणचा प्रसंग आला आहे!

**विदुषक**—अहो उद्यां मरावयाची पाळी आली, आणि मग

रडूं नको तर काय करूं ? तुम्ही बोलतां तें ठीकच. कारण पर दुःख शीतळ आहे.

**सूत्रधार**—तुजवर असा कोणचा प्रसंग आला आहे हें मला कळलें नाहीं ह्मणून असें म्हणतों.

**विदुषक**—तुम्हास कशानें कळणार ? अहो शहाणे गृहस्थहो, ऐका:- जैनांचा व ब्राह्मणांचा वाद होऊन शेवटीं घागरींत का-हीं घालून, राजानें आणून ठेविलें आहे. तें जे न सांगतील त्यांस राजा उदईक ठार मारून टाकणार आहे. म्हणून मी रडतों बरें काय- तुमच्यानें एकवत नसेल तर तुम्ही डोळे झांका कसे.

**सूत्रधार**—अरे भल्या मनुष्या असें वांकडें तिकडें कां बो-लतोस. बरें पण त्या जैन पंडीतांसच पराजय येणार म्हणून क-शावरून तूं म्हणतोस?

**विदूषक**—कशावरून म्हणजे तो कोणी घट्ट पायाचा ब्राम्ह-ण आहे त्यास अंतरज्ञान आहे, तेव्हां तो जैनांचा सहज पराजय करीलच, आणि तशी स्थिति आमच्या या भोजनबंधूस मु-ळींच नाहीं.

**सूत्रधार**—मित्रा तर भिऊंनको. जैनांला ती घटगत -स्तू समजली.

**विदूषक**—काय म्हणतां ? कशि कशी हो समजली ! तें सांगा तरी.

**सूत्रधार**—अरे त्यानीं, क्षपणक, म्हणून शकून पाहणारा आहे. त्याजकडुन त्या वस्तूचें ज्ञान करून घेतलें. परंतु उदईक काय होतें पाहावें.

**विदूषक**—तर मग मी आतां कोणत्याही देवाला भिणार

नाहीं. उद्यां तपनापाच्या घरीं आमच्या गुरूजीस आमंत्रण आहे, तेथें शिरापुरी खाऊन स्वस्थ मठांत झोंप घेईन तर.

**सूत्रधार**--पण मित्रा आतां तूं मौज पाहाण्यास राजवाड्यांत येत नाहींस काय? हे पहा सर्व जैनांचे थवे, व ब्राम्हणांचे समुदाय, पोळ्यावर मधमाशांनीं जशी लगट करावी तद्वत राजवाड्यांत जात आहेत, मी तर चाललों.

**विदूषक**--नकोरे बुवा कदाचित् जैनांचा पराभव झाला, तर मला ही सुळावर चढवितील, तेव्हां मी पळून जातों कसा. जैनांचा पराभव झाला तर ब्राम्हण होईन, नाहींतर जैन आहेच आहे (असें म्हणून पळून जातो. व सूत्रधारही निघून जातो.)

---

## प्रवेश ९.

(तदनंतर सुधन्वाराजा प्रधानाच्या हातास धरून प्रवेश करितो.)

**राजा**--मंत्रिवर्य तो कलश भांडारखान्यांतून आणऊन असा ठेवा, व सर्वत्रांस बोलावणीं पाठवा.

**प्रधान**--महाराज आज्ञेप्रमाणें कलश आणून ठेविला आहे. (घागरीकडे बोट दाखवितो.) तसेंच, बोलावणीं कशास पाहिजेत हे सर्व जैनपंडितही आले, व ब्राम्हणही येताहेत.

**राजा**--(घाबरेपणानें) अहो सचीव त्या जैनांची मुखश्री पाहा बरें, कां प्रसन्न आहे? किंवा निस्तेज दिसते?

**प्रधान**--(पडद्यांत पाहून) माहाराज त्यांचीं वदनें टवटवीत दिसतात. या वरून ते निर्भय आहेतसें वाटतें.

**राजा**--( दीर्घश्वास सोडून ) काय नीचांनां वस्तू समजली असेल काय ? प्रधानजी हें जर खरें होईल तर मात्र कठीण, कारण प्रतिज्ञा मी दारुण केली आहे.

**प्रधान**—महाराज आपण भिऊनये. जसें दोनदां ब्राम्हणांस यश आलें तद्वत या प्रसंगींही येईलच.

**राजा**—बरें काल सांगितल्या प्रमाणें फौजेची तयारी आहे-नां ?

**प्रधान**—सर्व आज्ञेप्रमाणें आहे, कांहीं काळजी करूंनये.

( इतक्यांत ब्राम्हण व जैन येऊन आपापल्या स्थानांवर बसतात. )

**राजा**—( सर्व सभा भरली असें पाहून ) मी उभय पंडितांस प्रणिपात करितो. ( असें म्हणून नमस्कार करितो. )

**ब्राह्मण व जैन०**—( एकदांच ) कल्याणमस्तु.

**राजा**—मंत्रिवर्य आतां माझी शेवटची प्रतिज्ञा या उभयतां वाद्यांस कळवा.

**प्रधान**--आज्ञा ( असें म्हणून उभाराहून ) माहाराज, सर्वत्रानीं माझें भाषण ऐकावें:--( मोठ्यास्वरानें ) ब्राम्हण पंडितांचा व जैन पंडितांचा मतवाद होऊन शेवटीं निर्णय सरकारांतून असा ठरला गेला कीं ( घागरीकडे बोट करून ) या कलशांत सरकारांनीं स्वत: जी गुप्त वस्तू घातली आहे, ती ज्या पक्षांतील लोक सांगतील. त्यांचा वाद खरा; व जे न सांगतील, किंवा उगाच बसतील, त्यांचा वाद खोटा ठरून, त्यांच्या कुळांसह सरकार त्यांस देहांत प्रायश्चित्त देतील. ज्यांस अपयश येईल, त्यांस शिक्षा देण्याकरितां सरकारांनीं तोफा भरून ठेविल्या आहेत; व राजांगणांत सूळ, व फांशी देण्याचे खांब पुरले आहेत

हे सर्वत्रांनीं पाहावें व जें बोलणें असेल तें बोलावें. एकवार मुखांतून अक्षरें निघून गेल्यावर, राजरूपस किंवा राजदंडास ते पात्र झाल्या वांचून राहाणार नाहींत. आणि फिरून त्यांची तक्रार ऐकिली जाणार नाहीं. ( असें बोलून खालीं बसतो. )

**राजा**—सर्वत्रांनीं माझी प्रतिज्ञा तर ऐकिलीच; तर मी पुनः प्रश्न करितों, हे बौद्धपंडितांनो, या घागरींत काय आहे हें सांगा.

**बौद्धसिद्धांतपंडित**—( मोठ्या उल्हासानें पुढें होऊन ) राजाधिराज या कलशांत महासर्प आहे.

**राजा**—( हें ऐकून सिंहासनावरून धाडकर जमिनीवर पडतो सेवक त्यास सावरून धरितात. )

**प्रधान**—( घाबरून जवळ येऊन राजास कवटाळून ) माहाराज सावध व्हावें सावध व्हावें. कोण आहेरे ? त्वरित पाणी घेऊन या. ( सेवक पाणी आणितात तें राजाच्या नेत्रांस लावितो. )

**राजा**—( सावध होऊन कपाळावर हात बडवून ) शिव ! शिव ! कायकर्मचांडाळ ! किती मी अधम पातकी ! देवा असल्या या अपयशी प्राण्याची किमर्थरे एवढ्या सत्कृत्यावर योजना केलीस ? ज्यां ब्राम्हणांस दुःखमोचित करावें म्हणून मी झटतों त्यांसच आतां ठार मारूं काय ? नको नको हा देह नको देवा ते माझे पितर नरकांत पडले तरी चिंता नाहीं. परंतु असें मी कुकर्म कधींही करणार नाहीं. हे भोलानाथ आतां शिरच्छेद करून घेण्याशिवाय दुसरा तरूणोपाय नाहीं. ( असें ह्मणून खड्ग शिरावर ठेवितो. )

**भट्टपाद**—( गडबडीनें पुढेंहोऊन ) हां, हां, हे सत्य प्रतिज्ञ राजा काय हें करितोस ? ( असें म्हणून खड्ग काढून घेतो ) अरे वादाची तड लाविल्या वांचून जर मेलास तर

नरकांत पडशील यास्तव एकपक्षीं ऐकून घेऊन निर्णय करूं नको. घागरींत जैन म्हणतात ती वस्तू नाहीं. मी काय आहे तें सांगतो ऐक.

**राजा**—काय कपाळ ऐकूं आतां ( असें म्हणून कपाळास हात लावितो. ) बरें महाराज बोला, बोला कायतें.

**भट्टपाद**—राजा त्यांत सर्प तर नाहींच; परंतु त्या सर्पावर शयनकरणाऱ्या वेदोनारायणाची ताम्रमय विष्णुमूर्ती आहे. काढून पाहा.

**राजा**—सचीव, सोडा त्या घागरीचें मुख.

**प्रधान**—आज्ञा. ( असें म्हणून मुख सोडितो तेव्हां आंत सर्प न निघतां ताम्रमय विष्णुमूर्तीनिघते. )

**राजा**—( तें पाहून साश्चर्य आनंदानें गहिंवरून. ) आ-हाहा. ! ( वर डोळेकरून ) हे प्रभो पुराण पुरूषा तुझें सामर्थ्य अगाध आहे. तुझी माया ब्रम्हादिकांस चकवित्ये; मग माझी कथा काय ? ( ब्राम्हणाकडे वळून ) अहो केवढाहो हा चमत्कार. मी प्रत्यक्ष सर्प घातला असून, या जैन पंडितांनीं सर्प म्हटलें असून, ब्रम्हणांस यश देण्याकरितां भगवंता ही मूर्ती झालासकाय ? तर मग मीं जें करणार तें तुला उचित इष्ट आहेच. ( प्रधानास रागानें ) अहो काय पाहातां काय ! दूतआणून या चांडाळांच्या मुसक्या आंवळवा. येथल्या येथें यांस ठारमारा. ओढा ओढा, यांस माझ्या डोळ्यां समोरून काढा. ( दूत येऊन सर्वत्रांच्या मुसक्या बांधून त्यांस आंत घेऊन जातात. नंतर पडद्यांत मोठा गलबला होतो व तोफांचे आवाज धडाधड होतात. व सर्व जैनांचा नाश होतो. )

**प्रधान**—( पुढें होऊन हात जोडून . ) आज्ञे प्रमाणें सर्वत्रांस शिक्षा दिली महाराज.

**राजा**—( आनंदानें ) कोण कोणांस कशि कशी शिक्षा दिली हें सांगा.

**प्रधान**—पृथ्वीनाथ ऐकावें:—बौद्धसिद्धांत, अमरसिंह, कविकंठपाश, जीमूतवर्षइत्यादि जे महान महान तीनशें पंडित या सभेंत रत्न जडित मंचकावर बसत होते त्यांस तोफेच्या तोंडीं बांधून एकदम उडविलें. तसेच बाकी सातशें पंडित सुवर्णासनावर बसणारे जे होते त्यांस सुळांवर चढविलें. आणि इतर असंख्य जे होते त्यांतून कित्येक फांशी दिले व कित्येकांचे शिरच्छेद केले. तसेंच शहरांतील एकंदर जैन मारण्यास दूत पाठविले आहेत, व त्यांच्या वधांचा क्रम चालला आहे.

**राजा**—( मोठ्या उल्हासानें ) हा दुष्टांनो योग्य शासन तुम्हांस घडलें.

**प्रधान**—सरकार आतां काय आज्ञा आहे !

**राजा**—सेतुबंध रामेश्वरापासून हिमाचलापर्यंत, इकडे पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत, जैनांच्या बायका असोत, पोरें असोत, वृद्ध असोत, तरुण असोत, त्या सर्वांस बेलाशक धरून मारून टाकावें. याप्रमाणें तुह्मांस माझी आज्ञा आहे. व राज्यांत जाहिरनामे पाठवा कीं, जैनांस जो आश्रय देईल, त्याच्या कुलाचें निर्मूळ होईल. “ सापसोडावा पण जैन मारावा ” अशा ताकिदी लिहून शिक्कामोर्तब करण्यास आरसे माहालांत घेऊनया.

**प्रधान**—आज्ञा माहाराज ( असें ह्मणून निघून जातो. )

**राजा**—कां मुनिवर्य तुमच्या कृपें या नीच संगतीपासून मुक्त झालों. आतां पुढें काय आज्ञा आहे ?

**भट्टपाद**--राजा तुझी कीर्ती चंद्रार्क आहेत तोंपर्यंत राही-ल. आतां मी मंडनमिश्र पंडिताच्या साह्यें कर्ममार्गाची प्रवृत्ती करितों. आतां विक्षेप करण्यास आम्हांस कोणीच नाहींत. मी येतों तर आतां *( सर्व ब्राम्हणांसह उठून उभाराहातों. )*

**राजा**--*( उठून नमस्कार करून ) माहाराज या दासानुदासावर अनुग्रह असावा.*

**भट्टपाद**--राजा तुजवर सर्वेश्वराचा अनुग्रह आहेच. याशिवाय असें यश येतेंचना. असो आम्ही येतों आतां बसावें. ( सर्वत्रांसह चालूं लागतो. )

**राजा**—मीही आपणास पोहोचविण्यास राजद्वारापर्यंत येतों. ( असें म्हणून सर्व निघून जातात. )

## जैन निःपातोंनामक दुसरा अंक

## समाप्त.



# अंक ३.

## पात्रें.

| | | |
|---|---|---|
| १ | आर्याअंबा .... .... .... | शंकराचार्याची माता. |
| २ | रमाबाई .... .... | तिच्या उपाध्यायाची बायको. |
| ३ | राधाबाई | गांवांतील ब्राह्मणाच्या बायका. |
| ४ | गंगाबाई .... .... | |
| ५ | सुबुद्ध .... .... .... .... | घरांतील विद्यार्थी. |
| ६ | शिवगुरू .... .... .... | शंकराचार्याचा पिता. |
| ७ | मंडनमिश्र .... .... | ब्राह्मणपंडित ( ब्रह्मदेवाचा अवतार. ) |
| ८ | कृष्णमिश्र .... .... | त्याचा शिष्य. |
| ९ | भट्टपाद | ब्राह्मणपंडित ( स्कंदाचा अवतार ) |
| १० | सुलोचन .... .... | एक विद्यार्थी. |
| ११ | सूत्रधार.... .... .... | नाटकाध्यक्ष. |
| १२ | विदूषक.... .... .... | त्याचा सोबती. |
| १३ | शंकराचार्य .... .... | जगद्गुरू ( शिवाचा अवतार. ) |

१४ गोविंद पूज्य पादाचार्य — शंकराचार्यांचे आश्रम गुरू. ( गौडपादाचार्यांचे शिष्य. )

१५ चांडाल .... .... .... .... वेषधारी ईश्वर.

१६ विश्वेश्वर .... .... .... साक्षात् कैलासनाथ.

---

# अंक ३.

## प्रवेश १ ला

स्थळ—केरळ देशांतील एकगांव.

( तदनंतर शिवगुरू ब्राम्हणाची स्त्री आर्याअंबा प्रवेश करितें नंतर, आणखी तीघी सुवासिनी प्रवेश करितात. )

**रमाबाई**—कां अंबाबाई? घरांतलं कामधाम आटपलं कां? यजमान आज कुठं दिसत नाहींत?

**अंबाबाई**—काम धाम कसलं आटपायचं? तुमच्या इथल्या सारखं कां आहे? येऊन जाऊन दोन माणसाचं काम. तें तरी मला काय करायचं असतं? मी आपली जेंव्हां तेंव्हां रिकामीच असतें. काय थोडसं काम असतं तें अग्निहोत्राकडील मात्र.

**गंगाबाई**—अहो अशी काय वेडपांघरतां! आम्हीं काय धुणी धुवावयची, खरकटी घासायची, हीं कामं बिचारली? तीं मेलीं आमच्या नशीबांस आहेतंच.

**अंबाबाई**—तर हो कसलीं आणखी कामं तीं? मलाबाई तुमच्या या छक्केपंजाच्या बोलण्याचा नाहीं अर्थ समजत मी आपली साधीभोळी बायको.

**राधाबाई**—मी सांगूकां? रागावणार नाहीं नां पण! पिंपळाच्या प्रदक्षणा, गाईची पूजा, महादेवाची लाखोली, हीं कामं झालीं कां? आताशा बाई तुम्हीं जेंव्हां तेंव्हां असल्या कामांत

निमग्न झाला असता. पण करायं काय ? त्या देवालाही करुणा येइना. केऊ नये एखादं पोटीं मूल.

**अंबाबाई**—इश्श मेलं कायतरी चावटपणाचं बोलणं बोलतां हो ! मी कां मुलांकरतां हे नेमधर्म करते ? असतील प्रारब्धीं तर होतील.

**गंगाबाई**—यांत चावटपणा कसला ? आणि तुम्हीं तरी चोरतां कां ? ठीकच आहे. त्यांत गैर कां कोणि म्हणल ? या वयांत जर मुलं न झालीं, तर म्हातारपणी कां व्हायचीं ! पण होतील कशीं ? त्यामेल्यांच्या हवंना नशीबीं सुख भोगायचं !

**रमाबाई**—अहो तें खरंच. जिथं खाया पियाला आहे. तिथं मुळींच मुल व्हायचं नाहीं; आणि जी मेलि भिकार्डीं, धडघरनाहीं, पोटभर अन्न नाहीं, त्यांच्या पाठीस वर्षास दोन दोन लागायचीं. अंबाबाई खरंच आमच्या मनांतकिनी फार आहे. पहा, तुम्हास एखादा चांलगा मुलगा व्हावा, आणि तो मी खेळवावा.

**अंबाबाई**—( उभ्वासटाकुन ) सार खरं बाई, पण नशीबीं हवंना मी तर ज्याणि ज्याणि जे जे सांगितलं तें तें करून करून दमलें. आतां एक शेवटचा उपाय करायचा आहे. ते घढा झाला म्हणजे संपलं.

**राधाबाई**—पण यजमानाच्या ममांत नाहीं कां कांहीं काळजी ? ते नाहीका कांहीं अनुष्ठान वगैरे करवीत ?

**अंबाबाई**—( लाजून ) वायांनो आज पर्यंत किनी ती गोष्ट सुध्दा ऐकण व्हायच नाहि; केंव्हां हिं बोला, " हवं कशाला मुल ? त्याचांचून काय अडलं आहे ? " असंच म्हणायच आताशा मात्र थोडीशी काळजी तिकडेहीं लागली आहे.

पण बाई करावं काय ! देवानच जर नशीबीं लीहिलं नसेल तर होईल कुठून ?

**रमाबाई**—असाधीर नकागडे सोडू तूमच कां वय गेलं अगदि ? होईल आतां. माझी बहीण कांचिपुरींनदिली आहे घरची तुमच्या सारखीच श्रीमंती आहे. पण बाई तिलाही पुष्कळ दिवस मूल नव्हत. दोघं नवरा बायको, या काळजीनं अगदीं झुरणीस लागलीं होतीं ; शेवटीं आली देवास करुणा- निझाला एक मुलगा. नुकते दोन महिने झाले. आणि म्ह- णाल तर ती माझ्याहून वडील बरं कां आतां यावरून पाहा म्हणजे झालं.

**अंबाबाई**—खरंच कां ? तुमचाहून वडील ती ? मग मात्र बाई आश्चर्य खरं पाहा गडे असं कांहीं ऐकलं कीं अंमळसा धीर येतो. आणि दुसऱ्या बायका मुलां बरोबर कौतुक करीत बसलेल्या पाहिल्या, कीं काय करूनये जीवच द्यावा असें वाटतें.

**गंगाबाई**—काय बाई भलतंच बोलताहें ? ( पडद्याकडे पाहून ) तो कोण मुलगा तुमच्याकडे धावत येतो आहे पाहा'

( इतक्यांत शिवगुरूपाशीं शिकणारा विद्यार्थी येतो )

**अंबाबाई**—अरे सुबुध्या, असा धांवत कां आलास ! को णास हुडकतोस !

**सुबुद्ध**—काकि तुम्हाला. आज इष्टी नव्हे काय ? तुम्हां करितां खोळंबा झाला आहे. चला लवकर.

**अंबाबाई**—अगबाई माझ्या ध्यानांतच नाहीं, गोष्टीच्या नादांत मीं सगळंच विसरलें. बायांनो आतां मी तिकडे जातें.

**सर्वजणी**—चलाबाई आम्हीही फारवेळ बसलों, घरीं काम

नर्शीच टाकून आलों तर आम्हीही जातों. ( असें म्हणून चालूं लागतात )

**अंबाबाई**—थांबा पण हें कायतें ? कुंकू तरीं लावतें. ( असें म्हणून कुंकू लाविल्यावर सर्व निघून जातात. )



## प्रवेश २

( तदनंतर भोजन आटपून शिवगुरू पंडित येतात )

**शिवगुरु**– ( पोटावरून डावा हात फिरवून )—

**॥ आतापिर्भक्षितो येन वातापिश्च महाबलः ॥**

**॥ अगस्त्यस्य प्रसादेन भोजनं मम जीर्यतां ॥**

( असें म्हणून आसनावर बसतो. ) ईश्वरा तुझी ब्रम्हांड घटक माया मोठी अगाध आहे. या संसारांत तूं कोणासही सुखी ठेवीत नाहींस; ज्यांस विद्या आहे त्यांस अन्न नाहीं, जांस अन्नाच्छादन यथेच्छ आहे त्यांत विद्या नाहीं, एवंच परमेश्वरा या त्रिजगांत तुझ्यावांचून सुखी दुसरा कोणी नाहीं मला संपत्ति यथेच्छ आहे, विद्या आहे, भार्या सुरूप सुशील असून माझ्या चित्ताभिप्रायाप्रमाणें वर्तन करिते; परंतु पोटीं संतान नाहीं, ही काळजी आमच्या सर्व सुखांत नाहींशी करून माझे शरीरासही क्षीण करिते. ही पहा ती चारूगात्री, माझें भोजन होतांच मला तांबूल द्यावा म्हणून तांबुलपात्र घेऊन येत आहे. हर हर या चंद्रवदनीच्या मुखावर सुतचिंतेनें पांडुरता आणली.

( नंतर तांबूलपात्र हातीं घेऊन आर्याअंबया प्रवेश करिते. )

शिवगुरू—या बसा. कां भोजन झालें कां इतक्यांत ? मला वाटते तूं पाटभर देखील जेवीत नाहींस. ( असें म्हणून हातीं धरून तिला जवळ बसवितो. )

अंबाबाई—( किंचित खालीं मान घालून ) बायकांच्या जेवणाला कितीसा वेळ लागतो ! काय तरी मला थट्टा करायची पोटभर न जेवायला काय झालें.

शिवगुरु—काय झालें म्हणजे ? मुला विषयीं काळजी. चिंते प्रमाणें अन्य व्याधी कोणचा आहे ? चिंते पेक्षां चिता एका बिंदूनें मात्र जास्त आहे, म्हणूनच चितेनें निर्जिवांचे दहन केलें तर ही सजीवांस जाळते.

अंबाबाई—ही चिंता मला एकटीलाच कां आहे ! मी वर वर दाखवितें, आपण आंतल्याआंत ठेवतां एवढेंच कायतें अंतर.

शिवगुरु—( प्रीतीनें आलिंगन ) खरें बोललीस. प्राणदयिते असाच प्रकार आहे. संतानांविषयीं स्त्रियां प्रमाणें पुरुषांनीं अधीर होणें हें हेटनास्पद आहे. पण मी आतां खचित सांगतों, माझाही धीर सुटला. कारण, अपुत्रिकांस परलोक नाहीं अशी श्रुती आहे; आणि तत्प्राप्तीची तर मुळींच निराशा झाली. नागबली नारायणबली झाले, सप्तशतीचे पाठ संपले, नवस, होम, इत्यादिक आतां कांहीं राहिले नाहींत. सारांश येणें करून मला विरक्तता झाली आहे, तेव्हां संन्यास घ्यावा आणि खऱ्या तत्वाची विवंचना करीत आयुष्याचे राहिलेले दिवस घालवावे इतकेंच आतांश वाटतें.

**अंबाबाई**—( खिन्न होऊन ) आपण संन्यास घ्याल किंवा कांहीं कराल, आणि देहाचं सार्थक करून घ्याल, पण मीं काय करावं ? याची नाहींच कां मुळीच काळजी ! बरं पण मला एक उपाय सुचला आहे, तो सांगू कां !

**शिवगुरु**—सांग सांग पाहूं. योग्यसा वाटल्यास तोही करून पाहूं.

**अंबाबाई**—या गावांत नुकतंच एक स्वयंभुलिंग उत्पन्न झालं आहे. माहाजागृतस्थान आहे. सर्व गांव त्याला भजतो; तेव्हां आह्मी उभयतां सर्व प्रपंच व घरं सोडून त्या देवालयांत जाऊन राहून, त्याची भक्ती करूं. आणि असा निर्धार करूंकीं, मनकामना पूर्ण झाल्या वांचून घरीं यायचं नाहीं, व अन्नही घ्यायचं नाहीं. असंही करतां त्यांतच शेवट झाला तरी चितानाहीं अन्यजन्मीं तरी असे निपुत्रिक होऊन उत्पन्न होणार नाहीं. कां मनाला येत नाहींसं दिसतं !

**शिवगुरु**—हा सिद्धांत योग्य आहे. परंतु तूं त्या कृत्यांत उपयोगी नाहींस. कारण एक उपोषण झालेंकीं, तुला उठवत नाहीं. इतकी तूं सुकुमार, मग हा एवढा निर्धार तुझ्यानें कसा होणार ? ह्मणून तूं घरींच राहून सर्व संभाळ मी जाऊन या प्रमाणें देवालयांत तप करितों.

**अंबाबाई**—कायतरीच काढायचं. अशा गोष्टीला मी आपल्या पेक्षां घट्ट आहे. माझी कांहीं काळजी करण्यास नको. माझा जो निर्धार झाला तो झाला. मी कांहीं राहायची नाहीं. आपणच पाहिजेतर घरीं राहावं.

**शिवगुरु**—बरंतर ( पडद्याकडे पाहून ) कोण आहेरे ? ( इतक्यांत सुबुद्ध नामक शिष्य येतो. )

**सुबुद्ध**—गुरूजी काय आज्ञा आहे ?

**शिवगुरु**—अरे सुबुद्धा, आह्मी उभयतां देवालयांत, तपेकरण्या करितां जाऊन राहाणार, तों पर्यंत घरांतील सर्व व्यवस्था तूं ठेवावीस आणि वरचेवर देवालयांत येऊन आमचा समाधान घेत असावा; व अग्निहोत्र चालू ठेवावें.

**सुबुद्ध**—( हात जोडून ) आज्ञा होते त्याप्रमाणें करितों माहाराज.

**शिवगुरु**—बरें आधीं पंचांग आण पाहूं, आज दिवस कसा काय आहे तो.

**सुबुद्ध**—आज्ञा ( असें म्हणून आंत जाऊन पंचांग आणून शिवगुरुच्या हातांत देतो. )

**शिवगुरु**—( पंचांग पाहून ) अरे वः आज " बुधानुराधा अमृतसिद्धियोग आहे. भिय चलावेंतर. आजच देवालयांत जाऊन राहूं.

**अंबाबाई**—मीही तयारच आहे ( असें ह्मणून सर्व निघून जातात. )



## प्रवेश २.

### स्थळ—माहिष्मती नगरी.

( तदनंतर माहाकर्मठ मंडनमिश्र शिष्यासह प्रवेश करितो. )

**मंडनमिश्र**—अरे कृष्णमिश्रा, माझ्या खोलींत जाऊन ड-

शार्शी जें मोठें पुस्तक आहे, त्यांत वरच एक पत्र ठेविलें आहे तें घेऊन ये.

**कृष्णामिश्र**--आज्ञा. मघा शिपायानें आणून दिलें व "आतां वाचण्यास फुरसत नाहीं मग भोजनोत्तर वाचीन" असें आपण म्हटलें, आणि सोंवळे होतां याजकारितां मजकडूनच ठेवविलें, तेंच कीं नाहीं ?

**मंडनमिश्र**--हो, हो, तेंच. तुला माहीत आहेच एकून जा तर आण पाहूं.

**कृष्णामिश्र**--आज्ञा. ( असें ह्मणून आंत जाऊन पत्र आणून मंडनमिश्राचे हातीं देतो. )

**मंडनमिश्र**--( पत्र वाचून मान डोलवून ) शाबास भट्टपाद्-वर्य शाबास सूर जय मिळविला. ( उद्गारानें ) आपण उत्पन्न होऊन सार्थक केलेंत. ( हात झाडून ) हा दुष्ट वेददूषकांनो, ठीक शासन तुह्मांस घडलें. शाबास सुधन्व्या योग्य न्याय केलास.

**कृष्णामिश्र**—गुरूजी ज्या पत्रानें आपल्या मुखास येवढी टवटवी आणिली, त्या पत्रांतील वर्तमान मला कळविण्याजोगें असल्यास, ऐकण्याची मला अति उत्कंठा आहे.

**मंडनमिश्र**--हो. हो. ऐकण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. ऐक:--वेदबाह्य जैनांचा पराजय भट्टपाद नामक माहापंडितांनीं केला. त्याकालीं राजा सुधन्व्यानें त्यांत मरणाची शिक्षा देऊन सर्व जैनज्ञातीचा निःपात करून टाकिला. असें, आमचे मित्र जे प्रभाकरभट्ट, त्यांजकडून हें पत्र आलें आहे.

**कृष्णामिश्र**—( संतोष पावून ) एकून ब्राह्मणांनीं, मोठें इष्टसूचकच हें, असें समजलें पाहिजे. ( मान डोलवून ) ठीक झालें. कायहो दुष्टांनीं आक्रमण केलें होतें. बरें त्या चांडाळांनीं

मोठीं मोठीं नमदेवतेचीं देवालयें बांधिलीं होतीं त्यांचें काय केलें? मला वाटतें, राजानें तीं पाडून टाकण्याचा हुकूम केला असेल.

**मंडणमिश्र**—छे, छे, " त्या मूर्ती काढून, शिव विष्णू, गणपती, देवी यांच्या प्रतिमा स्थापन कराव्या." अशा गांवोगांवच्या अधिकाऱ्यांस आज्ञा लिहिल्या आहेत.

**कृष्णमिश्र**—बरें, त्या दुष्टांनीं गीर्वाण भाषेंत मोठ मोठे ग्रंथ केले होते, त्यांचे काय केलें असेल बरें?

**मंडणमिश्र**—करावयाचें तें काय! त्यांचें मतच नष्ट झालें. वर्तेही निर्बीज होऊन गेले, मग त्या ग्रंथांस कोण आग लावणार! राजानें तीं सर्व पुस्तकें बुडवून टाकिलीं, आणि त्यांनून " अमरकोश " नांवाचा जो ग्रंथ आहे, तो विद्यार्थ्यांस फार उपयोगी आहे व त्यांत धर्माधर्म विचार नाहीं, ह्मणून तेवढा मात्र भट्टपादांनीं ठेवविला आहे.

**कृष्णमिश्र**—काय हो गुरुजी आनंदकारक वर्तमान आपण ऐकविलेंत. एकून ब्राम्हण मत भास्करास, लागलेलें ग्रहण सुटलें ॲ?

**मंडनमिश्र**—आज परमानंद झाला आहे, याकरितां आमच्या पाठशाळेस मोकळीक दिली आहे म्हणून तूं जाऊन कळीव. तसेंच या पत्रांत " ते वेद प्रकाश भास्कर मजकडे येण्यास तेथून निघाले आहेत " म्हणून आहे, तर काल किंवा आज ते भट्टपाद पंडित आमच्या नगरींत आलेच असतील. तेव्हां शोध करून आले असल्यास, त्यांस आतांच्या आतां घेऊन यावें कारण माझे नेत्र चकोर त्या अमृत किरणास पहावयास मुकेल आहेत.

**कृष्णमिश्र**—आज्ञा ( असें ह्मणून आंत जाऊन भट्टपादासह प्रवेश करून त्यास म्हणतो. ) महाराज हे आमचे गुरुजी

आपल्या भेटीविषयीं उत्सुक होऊन बसले आहेत, तर चलावें.

**मंडनमिश्र**—( भट्टपादास पाहून ) हो. हो. काय आनंद समय हा! यावें, यावें. ( असें म्हणून त्यास आलिंगून आपल्या शेजारीं बसाविता ) धन्य, धन्य, भट्टपाद गुरो आपण जें सत्कृत्य केलें त्याच्या कीर्तीचा झेंडा या भरतखंडांत नाचतो आहे. बरें त्यांच्याशीं वाद करितांना त्यांणीं विषय तरी कोणकोणते काढिले? व त्यांचें समाधान आपण कसकसें केलें हें थोडक्यांत सांगा पाहूं.

**भट्टपाद**—वादप्रवाद कांहींच सांगण्याजोगा झाला नाहीं. अहो तशानें कां ते पाखांडी पराभूत होत असते! परंतु तो राजाच चतुर त्याणें वादाचें कामच बंद केलें, व दैवी प्रमाणेंच करून निर्णय केला. प्रथम मात्र त्यांचीं व माझीं परस्पर दुर्भाषणें झालीं, तीं काय सांगावयाचीं आहेत?

**मंडनमिश्र**—ठीक, ठीक, ( हंसून ) एकून दिव्यानेंच कां मत निर्णय झाला? अस्तु. कोणीं कडून निष्कंटक पृथ्वी करून सोडिलीत फार उत्तम गोष्टी.

**भट्टपाद**—बरें पण आपण कसे आलांनाहींत? मला आपला फार भरंवसा होता

**मंडनमिश्र**—मला कळलें नाहीं; आणि जें कळलें त्यांत आवाहन आणि विसर्जन एकदांच. हें पाहा काल प्रभाकर भट्टाचें पत्र आलें; त्यावरून मला हें सर्व समजलें. असो न आलों म्हणून आतां हळहळ वाटत नाहीं, कारण जी इष्ट सिद्धी व्हावयाची ती झालीच.

**भट्टपाद**—बरें आतां कर्म मार्गाची प्रवृत्ती झाली पाहिजे, आणि हें काम आपलें आहे. मी आतां पार पडलों.

**मंडनमिश्र**--मींही तें कार्य चालविलेंच आहे. आतां एक ही सांगतो. या कर्ममार्गास प्रतिकूल जो वेदांत मार्ग, तो पण अगदीं बंद केला पाहिजे. आणि वेदांतपर ज्या श्रुति हेत. त्यांचा कर्मपर अर्थ पांडित्य बळें करून. नसले नवीन थ करून, प्रचारांत आणिले पाहिजेत. त्याशिवाय आपला क र्ममार्ग व्हावा तसा विस्तृत होणार नाहीं तेव्हां असा तुह्मीही क ग्रंथ करा व मीही करितों. मीं आतांशा तर असें चालविलें ाहे कीं संन्याशी अढळला कीं त्यास जिंकून, त्याचें पुनःलग्न रवितो, व त्यास कर्मे करण्यास लावितों.

**भट्टपाद**--असेंच केलें पाहिजे. त्या शिवाय अव्याहत द्वा- ार्ग चालणार नाहीं. बरें आहे तुझ्या इच्छे प्रमाणें मीही असा क ग्रंथ करितों.

**मंडनमिश्र**--माझा तर नियमच आहे कीं संन्याशी पाहिला ह्मणजे स्नान करावयाचें. असो आज आतां पंक्तीचा लाभ दिला पाहिजे.

**भट्टपाद**--हो, हो, त्यास काय प्रत्यवाय आहे? आह्मी यथ आल्यावर दुसरेकडे कां भोजन करणार आहों.

( इतक्यांत शिष्य येतो. )

**शिष्य**--महाराज, पात्रें वाढून तयार आहेत-

**मंडनमिश्र**--आम्हांकडून विलंब नाहीं. भट्टाचार्य चलावें.
( असें म्हणून उभयतां हातांस हात धरून निघून जातात,
व शिष्यही गडबडीनें निघून जातो. )



# प्रवेश ४

( तदनंतर सुबुध्द व सुलोचन असे दोन
विद्यार्थी येतात. )

**सुलोचन**--कां मित्रा सुबुध्दा, आज फार गडबडींत आहेस !

**सुबुध्द**---अरे, गडबड म्हणजे, तुला कांहींच कां माहित नाहीं ? अरे आमच्या गुरूजीस पुत्र झाला, व आज बारावा दिवस इतक्या वेळ नामकर्णाचा विधी होऊन ब्रम्हणभोजन झालें. आतां बायकांचा, मुलास पाळण्यांत घालण्या संबंधी शिष्टाचार व्हावयाचा आहे व तिकडे लागेल तें सामान देण्याचें काम गुरूजींनीं मला सांगितलें आहे. म्हणून मी गडबडींत आहें समजलास.

**सुलोचन**---( आश्चर्यानें ) अरे खरेंच कीं काय ! वः उत्तम गोष्ट झाली. फार दिवस पुत्र पुत्र म्हणून ती माउली आर्याअंबाबाई श्रम करीत होती. बरें झालें. ईश्वरास करुणा लवकरच आली म्हणावयाची.

**सुबुध्द**---अरे श्रम म्हणून काय विचारावे, शेवटीं आमचे गुरूजी आणि काकी ही उभयतां शिवालयांतच जाउन राहिले. आणि निरशन व्रत करून त्यांणीं तेथें मोठे उग्र तप केलें तेव्हां शिव प्रसन्न होऊन " मीच तुमच्या उदरीं अवतीर्ण होतों का. हीं काळजी करूंनका " म्हणून स्वप्नांत सांगते झाले.

**सुलोचन**--अरे वः , एकून या विप्रभास्कराच्या उदरीं साक्षात् कैलास नाथांनीं अवतार घेतला म्हणातर. बरें त्या बाळकावर कांहीं अलौकिक चिन्हें आहेत कारे ?

**मुकुंद**—विचारतोस काय? त्या बालकाकडे पाहातां दृष्टी दिपतात जनन काळीं पांच ग्रह एकादश स्थानीं होते. उपजतांच, ज्या वेळीं जातक विधी गुरूजीनी केला त्यावेळीं मोठे मोठे ज्योतिषी आले होते, त्यांणीं त्या वेळेवरून बालकाचें जातक वर्णन केलें आहे, त्यांत त्यांणीं सांगितलें कीं " हा बालक अवतारी पुरूष आहे, तसेंच चारवर्णाच्या धर्माचें स्थापन करून हा जगद्गुरूत्व मिळवील आणि उपनिषद् वर महाभाष्य करील, व दिग्विजय करील. "

**सुलोचन**—बरें पण त्या सत्पुरुषाचा जनन दिवस कोणता? हें आधीं सांग.

**मुकुंद**—आज बारावा दिवस म्हटलें यावरून तुला कळला नाहीं काय! अरे त्या पुण्य पुरुषाच्या जनना विषयी एका कवीनें एक श्लोक केला आहे तोच तुला सांगतो ऐक:—

॥ श्लोक ॥

**प्रासूत तिष्यशरदामतियातवत्यां**
**एकादशाधिक शतोन चतुःसहस्र्यां ॥**
**संवत्सरे विभवनाम्नि शुभे मुहूर्ते**
**राधे सिते शिवगुरोर्गृहणी दशम्यां॥ १ ॥**

अरे मित्रा सुलोचना " कलीचीं ३८८९ वर्षे गेलीं असतां विभवनामसंवत्सरीं वैशाख शुक्ल दशमी माध्यान्हीं शुभमुहूर्ती शिवगुरुपंडिताची स्त्री आर्यांबा, शंकराख्य बालकास प्रसवती झाली. " असा या श्लोकाचा अर्थ आहे.

**सुलोचन**--शाबास, शाबास, सख्या तूं मला या वेळीं आनंद समुद्रांत बुडविलेंस. अरे आतां जीं जीं ऐकावीं, तीं, तीं, अल्हाद कारकच वर्तमानें. पर्वा जैनांचा सर्व नाश झाल्याचें ऐकलें, व आज हें. एकून सांप्रत या भूमीवर पुण्य पुरूषच उत्पन्न होऊं लागले आहेत, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

**सुलुब्ध**--खरें आहे. ( मागें पाहून ) मित्रा आतां जाऊंदे. मला त्या पहा गांवांतील सुवासिनी, हातांत ओटींचें सामान घेऊन मुलास पाळण्यांत घालण्यास, येताहेत; तर आतां मला तिकडे हाका मारतील.

**सुलोचन**--बरें आहे जा. मीही जातों. ( असें ह्मणून निघून जातो.

( तदनंतर तिघी सुवासिनी, हातांत ओटीच्या सामानांचीं तारें घेऊन प्रवेश करितात )

**रमाबाई**--( इकडे तिकडे पाहून ) काय बाई चमत्कार तरी! आह्मांला मात्र त्या चोम्बावगारणीनें गडबड केली हातांतलं काम देखील पुरं करूं दिलं नाहीं. आणि इथं पहावी तर सगळीच सामसूम दिसते.

**राधाबाई**--होय बाइ मलातर अगदीं रिकामपण नव्हतं उद्यां गांवाला जाणं होणार ह्मणून मी त्या तयारींत होतें, पण जेव्हां तिची ती गडबड पाहिली, तेव्हां म्हटलं लवकरच आटपून यावं नि मग आपलं काम करावं पण अजून इथं उशीर दिसतो. तर मी घरीं तरी जाऊन येऊंका!

**गंगाबाई**--पुरेग तुझं भलं कौतुक. आतां इथपर्यंत येऊन का तूं परत जाणार! ठाऊक आहे, गांवाला जाणार ह्मणून काय इतके घोडे शृंगारायचे नाहींत.

**राधाबाई**—कायतरी तुझं बोलणंग हें? तुझ्यातर बाई तोंडाला हाडच नाहीं. अग उद्यां गांवाला जाणं होणार, मग नको कां, कांहीं फराळांचं बिराळाचं करून द्यायला?

**गंगाबाई**--हं, हं, यजमान कां जाणार? मीं समजलें तुझीच धिडका जायाची वाटत, तर मग दोन तीन पायलीचं फराळाचं, आणि पांचसात मणाच बिराळाचं, करून दिलंच पाहिजे. जा बाई हां.

**राधाबाई**--तुझ्या बाई तोंडाला कुणी लागावं. तोंड नव्हे तो जळला तोफखाना. दोन तीन पायलीचग कशाला पाहिजे आणि "बिराळाचं" तेंग काय? इश्श आम्हाला नव्हती ही असली बोलणी ठाऊक.

**गंगाबाई**--हळु हळु "इश्श" करून मुरकतानां मान माहींना मोडली? किति जबरा नखरा करितेत. नथ काय उडवितेस. तसं स्वरूप चांगलं असतं ह्मणजे काय केलं असतस कायकीं.

**राधाबाई**—अग माझं असूंदे, पण तुझंतरी नाशीक त्रियकात गेलं आहे म्हणूनच बर आहे. नाहींतर आम्हाला काय दिसत नव्हतीस, कोणच्यातरीं एखाद्या राजाची राणीच झाली असतीस.

**रमाबाई**--अग अशा भांडतां कां? मी कधीं ना कधीं पहातें, या दोघी एकें ठिकाणीं मिळाल्या, म्हणजे यांच आपलं कांहिं तरि आहेच (त्यादोघीस बोलते) अग, थोरांच्या घरीं आल्या वेळीं तरी बेताबातान असावं, मागच्या जन्मीच्या मेल्या दांवदारणी हेल्या वाटतं (मुचुध्यात) कायरे अजून किती उशीर आहे? इथं तर कांहीच जमाजम नाहीं नी आम्हालाच कशाला इतकी गडबड केली?

**सुबुध्ध**--अहो जमाजम ती काय करायाची हा येथें पाळणा बांधला आहे- इकडे बसावयास घातलें आहे. बाकी काय नारळ, खण, वगैरे किरकोळ सामान पाहिजे तें आंत आणून चाळंतीच्या खोलींत ठेविलेंच आहे तुह्मी ही आलाच, आतां उरकून टाका म्हणजे झाले.

**राधाबाई**--अरे पण कणकीचे दिवे केलेले कुठं दिसत नाहींत इथं ?

**सुबुध्ध**--ते बायकांनीं तयार करण्याचे मला काय विचारतां ! पाहिजे तर करून घ्या आतां. त्याला काय उशीर लागतो.

**रमाबाई**--आतां मुलाला घेऊन अंबाबाईला बाहेर या म्हणाव तर.

**सुबुध्ध**--ही खोली. त्या सारें तुमचें बोलणें ऐकताहेत. हाक मारा ह्मणजे झालें.

**गंगाबाई**--इथंच कां आहेत ? अग बाइ मला ठाऊकच नाहीं मी आपली हवं तसं बोलत होतें.

**रमाबाई**--( पडद्याकडे पाहून ) अहो अंबाबाई या आतां बाहेर ह्या सगळ्या बायका तुमची वाट पाहाताहेत. ( सुबुध्धास ) अरे त्यांना शालजोडी पांघरण्यास आणून दे जा; आणि त्या लवंगीस ह्मणाव कीं " जोडा त्यांस पायांत घालण्यास दे आणि तूं मुलास घेऊन बरोबर ये.

**सुबुध्ध**--अहो बाई ती तयारी अगोदरच केली आहे, त्या शालजोडी पांघरूनच बसल्या आहेत. व तेथेंच लवंगीही आहे, 'येताहेत आतां बाहेर. तुमची मात्र उगीच गडबड चालली आहे.

**रमाबाई**—अरे गडबड ह्मणजे ? मुहूर्त चलला कीं नाहीं. आमच्या घरीं सांगितलं आहे कीं " बारावर दोन वाजण्या-च्या आंत समारंभ आटपून घ्या " कारण मग वैधृती येते. म्हणून मी गडबड करितें हो.

**सुबुध्ध**—खरें पण ते आले नाहींत कोठें ? त्यानीं यावें कीं नाहीं ?

**रमाबाई**—अरे यांत पुरुषांचं काय काम आहे? सकाळ पासून याज्ञिकाकडल्या खटपटींत असायाचें नव्हे काय ? तेव्हां दमून आतां अंमळ आडवे झाले आहेत.

**सुबुध्ध**—उपाध्येपण गुंडाळण्या पुरती खटपट, बाकी रा-घायाला आम्ही होतोंच.

**रमाबाई**—कायमेल्या राबून राबून दमलास तें मला ठा-ऊक आहे पण. फराळाचं पोटांत पडे पर्यंत दिसत होतास मग कुठं तोंड घेऊन गेलास कोण जाणे. अहेराच्या वेळेस, सुबु-ध्धा, सुबुध्धा म्हणून सगळ्या वाड्याभर ओरड चालली. मग तो दुसरा एक नवीनच आला आहे. त्यानं तो अहेर काढून दिला. आणि मेला सांगतो ' राबायला आम्ही होतोंच ' बो-लायला लाज कशी नाहीं वाटत ती ?

**सुबुध्ध**—( हंसून ) हं आटपा आतां लवकर. ह्या पाहा काकूही आल्या.

( नंतर लहान मूल शालजोडींत गुंडाळून घेणाऱ्यां दासीसह आर्याअंबा प्रवेश करिते. )

**रमाबाई**—( आर्याअंबेच्या हातास धरून ) अशा पाटा-वर येऊन बसा. ( आर्याअंबा बसते ) अग लवंगे मुलाला

त्यांच्या मांडीवर दे. तोंड पहात काय उभी राहिलीस? इतकं कस माणसानां कळत नाहीं अगदीं! ( ती मुलास आर्याअंबेच्या मांडीवर देते. )

**अंबाबाई**—मला एकटीलाच बसऊन तुम्ही सगळ्या उभ्याकां? खालीं नाहीं कां बसायचं?

( सर्व बायका खालीं बसतात. )

**रमाबाई**—अंबाबाई आज दोनवर्षांखालीं आम्हीं तुमची थट्टा केली ती वेळ आठवते कां? मुला करतां कितीतरी घाबरला होता. आतां झालीना चिंता सर्व दूर?

**अंबाबाई**—( लाजून खालीं मान घालून ) तुह्मा चारचौघींच्या आशिर्वादानं आज हा दिवस मीं पाहिला.

**रमाबाई**—( गडबडीनें ) बायांनो, अशा कां बसला आतां? भरा एकेक ओट्या. आटपा लवकर. थंडींत बाळंतीण बायको कितीवेळ बसेल.

**राधाबाई**—अहो तुम्ही उपाद्धीणबाई नव्हे कां! तुमचा मान अगोदर. तुमची ओटी झाली, म्हणजे आम्ही भरतों.

**रमाबाई**—असं काय? बरं मीं अगोदर भरतें. ( असें म्हणून आर्याअंबेची खण नारळ घालून ओटी भरते. व लुगडें हातांत देऊन ) अंबाबाई हें लुगडं तुम्हीं आतां नेसलं पाहिजे.

**अंबाबाई**—( लुगडें खालीं ठेऊन ) मीनाही घेणार हें हो काय? आम्हींच तुम्हाला द्यावं, तें सोडून मी तुम्हाकडून लुगडं घेऊन नेसूं काय? मला घरांत काय ह्मणतील?

**रमाबाई**—( हिरमुसल्या सारखें करून ) असं नकागडे बोलूं. आम्ही नेसतों ही कुणाचीं? तुमचीच नव्हत कां! नवानवसांनीं तुम्हाला मुलगा झाला आहे, त्यावेळीं आम्हीं दे-

ऊंनये तर केव्हां द्यावं ? उद्यां त्याच्या लग्नांत चार लुगडीं मी घेईन. पण एवढं माझं गरीबाचं तुम्हीं घेतलंच पाहिजे. ( असें म्हणून लुगडें पुन: हातीं देते. )

**सुबुद्ध**—आवळा देऊन कोहळा काढण्याची ही मोठी नामी युक्ति बुवा.

**अंबाबाई**—बरं असूंद्या ( असें म्हणून लुगडें घेते. )

( बाकीच्या सर्व बाया तिची ओटी भरतात व लुगडीं देतात. )

**रमाबाई**—या इकडे आतां मुलगा ( असें म्हणून आयाअंबेपासून मुलास घेऊन त्याचा मुका घेते. ) अंबाबाई कितीतरी लबाड आहे हा पाहिलात कां ? मजकडे कावरा बावरा होऊन बघतो. मी आई नव्हे, इतकं तो समजला. ( मुलास उजेडांत धरून पाहून ) अंबाबाई, सगळी आंगलट, तोंडाची ठेवण तुम्हा सारखीच आहे पण वर्णमात्र तिकडला.

**राधाबाई**—( जवळ येऊन ) थोराडपणा मात्र आजवळा कडला आहे. ( मुलाच्या तोंडाजवळ तोंड नेऊन ) हा लुच्चा. ( असें म्हणून मुका घेते. )

**गंगाबाई**—अहो आटपा लवकर रमाबाई, मुहूर्ता साठीं तुम्हीच गडबड करीत होता नितुम्हीच खेळूं लागला. उद्यां या आणि सावकास बसा कौतुक करीत.

\+ **सुबुध्ध**—एकदा माझ्या हातांत द्याचें मला पाहुंद्या.

× **रमाबाई**—अरे तुला पाहून काय करायचं. उशीर होतोनां !

\+ **अंबाबाई**—रमाबाई, जरा द्यानांका त्याच्या जवळ.

\+ **रमाबाई**—( तसें करते. )

+ **सुबुध्ध**—अहो. घ्या लौकर. हो माझ्या हातांत फणसाच्या गऱ्यासारखा वळवळ करतो.

**रमाबाई**—( घेऊन पाळण्याजवळ जाऊन ) पण नांव काय ठेवायचं ? अरे सुबुध्धा, जा जाऊन बाहेर विचारून ये.

**सुबुध्ध**—विचारायाचें काय ? सकाळीं नामकरण झालें तेव्हां ठरलेंच आहे. काकूस नाहीं कां ठाऊक ? श्रीशंकर रूपें हा मुलगा झाला म्हणून याचें नांव शंकर ठेवायाचें.

**रमाबाई**--बरतर राधाबाई, माझ्या समोर उभ्यारहा. ( असें ह्मणून दोघी पाळण्यास मध्यें करून उभ्याराहतात. ) गोविंदघ्या. ( असें ह्मणून पाळण्याखालून मुलास राधाबाईचे हातांत देते. )

**राधाबाई**--गोपाळ घ्या ( असें म्हणून मुलास घेऊन ) शंकरघ्या ( असें म्हणून पाळण्यावरून मुलास रमाबाईचे हातांत देते. )

**रमाबाई**--( मुलास घेऊन पाळण्यांत निजविते आणि त्याच्या कानाशीं तोंड नेऊन ) शंकर बाळा, शंकर बाळा, कुर्र. ( बाकीच्या बायका तिच्या पाठीवर बुक्या मारितात. ) अहो पण हळु माझी पाठ मोडलीनां. या, अंबाबाई, आतां पाळण्यास हात लावा. बायांनो, तुम्हीही लावा. ( नंतर सर्व पाळणा हालवुं लागतात. व पाळणा म्हणतात. )

## पाळणा.

जो जो जो जोरे ॥ आचार्या ॥ पूज्या सद्गुरुवर्या ॥ श्रम तुज बहु झाले ॥ सुरकार्या ॥
हलवी शिवगुरुभार्या ॥ जो जो० ॥ १ ॥

सत्पथ राखाया ॥ यति होसी ॥ द्वैतमतातें हरिसी ॥ मंडनमिश्रातें ॥ जिकुनियां ॥ परकायावश होसी ॥ जो जो० ॥ २ ॥ झाला दिग्जय ॥ विश्रांती ॥ आनंदीं घे शांती ॥ वसुधासुरखंती ॥ घालविली ॥ प्रसाद हो बळवंतीं ॥ जो जो० ॥ ३ ॥

**अंबाबाई**—झालानां आतां जाऊ मी आंत !

**रमाबाई**—झालं. पण एक शिष्टाचार राहिला.

**अंबाबाई**—तो कोणचा ? सांगा बाइ लवकर बसून बसून माझ्या पायाला मुंग्या आल्या.

**रमाबाई**—अहो, दुसरं काय ! तुम्हीं नांव घेतलं पाहिजे.

**अंबाबाई**—इश्श हें काय हो ? हंततील कोणी नांव काय म्हणून आतां घ्यायचं

**रमाबाई**—छे, त्यावांचून ह्या बायका तुम्हाला आंत जाऊं देणार . नाहींत.

**अंबाबाई**—( गालांतल्या गालांत हंसून ) तर मग अगोदर तुह्मीं घ्या. नंतर ह्या सर्व बायकांनीं घ्यावीं मग मीही घेईन.

**रमाबाई**—तसंनव्हे. हा आजचा तुमचा मान आहे. आणि आम्ही घेणं हें उगीच. पाहिजेतर घेतील या लहान लहान मुली. ( अंमळ थांबून ) घ्या आतां लवकर तुम्हाला बाहेर येऊन फारवेळ झाला.

**अंबाबाई**—( कपाळास आठ्या घातल्यासें करून ) पुरेच ?

ई तुमची कटकट. ( अंमळ विचार करून ) सांबाच्या ( इ- तर्के अर्धेच बोलून लज्जित होते. ) मी नाहीं बाइ मला लाज वाटते. ( असें म्हणून खालीं पाहूं लागते. )

**रमाबाई**--घ्याचटकर नि चला लवकर बाजेवर. त्यांत लाज कसली ? इथ कोण आहे.

**अंबाबाई**—मग तुम्हा सगळ्यात मी सोडायची नाहीं हो सांगतें.

**रमाबाई**—बरं आम्हीहि घेऊं. अशा आनंदाच्या वेळांत जर नावं घेऊं नयेत तर घ्यावीं केव्हां ?

**अंबाबाई**—ऐकातर--

॥ **सांबाच्या पिंडीवर वाहेली पांच मोती** ॥
॥ **शिवगुरुमाहाराजा सारिखे जन्मो जन्मीं मिळावे पती** ॥

( नंतर बाकीच्याहि नावे घेतात. व सर्व निघून जातात )

---

## प्रवेश ९.

( तदनंतर तोंडानें कांहीं बडबडत विदूषक येतो व त्या चे मागोमाग सूत्रधार प्रवेश करितो. )

**सूत्रधार**—( पुढें पाहून ) अरे मित्रा विदूषका तूं अद्याप जिवंत आहेस काय ?

**विदूषक**--तुमच्या डोळ्यांत कां मी सलूं लागलों ! मला

मरणाचे डोहाळे झाले होते, परंतु लवकरच, सावध झाल्यानें अद्यापी वांचून आहे.

**सूत्रधार**—अरे पण तूं कोणा सरकारी कामगारास, जैन आहेस असें कळलें तर, ते लवकरच, तुझ्या ढेरपोठ्या गुरुजी जवळ तुला पोहोंचवितील.

**विदूषक**—( चवताळून ) तोंड आटपून बोला; कोणाला हो जैन ह्मणता ? गळ्यांतील हे लंगर तुमच्या डोळ्यांस दिसत नाहींत काय ? ( असें म्हणून गळ्यांतील जानवें दाखवितो. )

**सूत्रधार**--( हंसून. ) पाहिलें; पाहिलें. एकून तुझी ही धर्मसंक्रांती बरीच लवकर पालटते. अरे, प्रथम ब्राह्मण असून, मिष्टांन लोभें जैन झालास; आणि मरणाची पाळी येण्या बरोबर पुन: ब्राम्हण बनलास ? शाबासरे शाबास ( असें ह्मणून त्याच्या पाठीवर हात थापटतो. )

**विदूषक**—जाउंदे हो ती गोष्ट अतां फिरून काढूनका. तुम्हालाच ठाऊक कीं मला ठाऊक.

**सूत्रधार**--बरें पण गड्या, त्या महा संकटांतून तूं कसा पार पडलास !

**विदूषक**—अहो ते दिवशीं मी तुम्हास भेटलों, त्यानंतर दुसरे दिवशीं मी बस्तीच्या देवालयांत स्वस्थ अजगरासारिखा पडलों होतों. इतक्यांत दहा पांच शिपाई घेऊन फौजदार आला. आणि त्यानें, एकदम शिपायां कडून आमच्या गुरूजीस व त्यांच्या बाकींच्या शिष्यांस चतुर्भूज केलें, आणि बाहेर ओढिलें. तेव्हां मी घाबरून, हातांतला मोराच्या पिसांचा कुं-

चला टाकून देऊन, गळ्यांत जानवें घालून " राम राम असें ह्मणत बसलों.

**सूत्रधार**—ह्मणूनच निभावलास. बरें पुढें ?

**विदूषक**—मग त्यांनीं त्यांस तेथेंच बाहेर काढिलें, व र जाज्ञा त्यांस कळवून, त्यांचा शिरच्छेद केला. हें पाहून । मला जे झालें तें सांगवत नाहीं. हा प्रकार आटपतांच, मी । प्रांतच सोडून दिला. आणि इकडे आलों.

**सूत्रधार**—मोठ्या अपमृत्यूंतून चूकलास, पण आ तरी खात्री झाली कां ? " स्वधर्मे निधनं श्रेयः " या व क्याचा अर्थ आतां तरी खरा वाटतो कां ?

**विदूषक**—हो, हो, आतां कानांस खडाच लाविला. कां होईना, ब्राम्हण धर्म सोडावयाचा नाहीं. असो. अहो पण आणखी एक विसरलों. मी आतां मोठ्याचैनींत आहे. थोड्याच दि वसांपूर्वी माझें लग्नही झालें.

**सूत्रधार**—अरे खरेंच कीं काय? हें कसें संधान केलेंस

**विदूषक**—कसें म्हणजे ? काय विचारता हो ! या फाक ड्यांची अक्कलच तशी आहे. मंडनमिश्र ह्मणून माहिष्मती नगरींत एक पंडित आहेत; ते संन्याशांचा तिरस्कार करिता. त. हें तर तुम्हीं ऐकिलेंच असेल. आतां त्यांचा काय नेम आहे म्हणाल, तर संन्याशी पाहिला कीं त्यास जिंकून त्याचें लग्न करितात. ह्मणून मी लटकाच संन्याशी झालों आणि त्याच्या नगरींत गेलों, तेव्हां मला " वादकर " असें कि- त्येक पंडित येऊन बोलूं लागले. मग मला तें येत नाहीं; असें मी म्हणतांच, त्यांणीं मला बलात्कारें धरून, माझी भगवीं ब-

त्रें काढून घेऊन, मला पांढरीं वस्त्रें दिली आणि लागलेंच माझें एका फाकड्या तरूण स्त्रियेशीं लग्न लाविलें.

**सूत्रधार**—एकून आतां मात्र तुझ्या अकलेची सीमाच झाली बरें पण आज इकडे कोणीकडे.

**विदूषक**—अहो या गावांत कोणी शिवगुरु ह्मणून, अति विद्वान ब्राम्हण मोठे संपत्तिमान आहेत. त्यानां एक शंकर नांवाचा पुत्र मोठ्या नवसानें झाला आहे. व त्याचें उपनयन होणार आहे. तेव्हां चार दिवस चळचळीत तूप पोळी मिळेल म्हणून नवीन केलेल्या कुटुंबा सह येथें आलों आहें.

**सूत्रधार**—अरे तें तर झालेंच. अरेरे ! थोडक्यांत चुकलास सर्व समारंभ व देकार, नुकताच आटपला.

**विदूषक**—( हिरमुसल्या सारिखे करून ) तर मग मला व्यर्थ हेलपाटा पडला. बरें आतां मी तिकडे गेलोंतर दक्षिणा तरी मिळेल कीं नाहीं !

**सूत्रधार**—छी, वेड्या, कोठली दक्षिणा घेऊन बसलास तीं आपल्या दुःखांत चूर आहेत.

**विदूषक**—तें कसलें हो दुःख ? सांगा, सांगा, लवकर.

**सूत्रधार**—त्या शिवगुरूपंडितांस देवाज्ञा झाली. हर हर ! ो आवठण काढिली कीं बाईट वाटतें. केवढा हो विद्वान, ाय हो लीनता, एकून असा पुरूष मात्र विरळा. इतक्या ल्पवयांत, व असा उत्तम पुत्र झाला असतीं, ईश्वरा, त्या त्पुरुषांस कांहीं दिवस सुख भोगूं दिलें नाहींस, हा तुझा अन्याय आहे.

**विदूषक**—अरेरे ! एकून माझी दक्षिणा बुडाली अं ! तर ग मोठा घातच म्हणायाचा,

**सूत्रधार**—जळो तुझी दक्षिणा. तसला ब्राम्हण जर वांचता तर तुला हवी इतकी दक्षिणा मिळाली असती.

**विदूषक**—बरें पण, त्यांचे घरीं बाकीचीं माणसें तरी जिवत आहेतना ?

**सूत्रधार**—अरे, काय अभद्र भाषण बोलतोस हें ? सर्व आहेत. आणि ईश्वर, त्यांस सदोदित असेच सुखी राखो. ( पडद्याकडे पाहून ) अरे ही पहा, ती माझा सती शिवगुरूची पत्नी इकडेच आली. शिव शिव ! त्या साध्वीची ही वैधव्यावस्था माझ्यानें पाहावत नाहीं. तर मित्रा, चल आपण एकीकडे जाऊं.

( असें म्हणून दोघे निघून जातात. )

---

## प्रवेश ६

( तदनंतर विधवा आर्यांबेचा प्रवेश करिने )

**अंबाबाई**—( मोठ्या दुःखानें खालीं बसून कपाळास हात लाऊन ) जगदीश्वरा, तुझ्या मनास येईल त्या प्रमाणें तूं मनुष्यास वर्तवितोस. ( दुःखाचे हेल काढून ) नरकवासाहून आते पाडादायक जें वैधव्य, त्याचा पूर्ण अनुभव देण्यास मी कशी तरी वांचलें? सहगमन करणार होतें, परंतु काय करूं लहान पुत्र त्याचं संरक्षण कसं होईल! या मायापाशांत गुंतून त्या सुखासही मुकलें. अरेरे! परंतु मला इतकं ज्ञान झालं नाहीं कीं, ईश्वर कोणा वांचून कोणाचंही अडूं दे.

त नाहीं. असं जर नसतं तर त्यास, जंगन्नियंता असं कोण म्हणत असतं ? ( विचार करून ) असो आतां दुःख करून काय फळ ? ज्या करितां त्या सुखासही अंतरून बांचलें, त्याजकडे दृष्टि देऊनच दिवस ढकलावेत हेंच आतां चागलं ( गहिंवरून ) माझ्या बाळाचे एकेक गुण पाहिले कीं पदोपदीं त्यांची आठवण होते. असते म्हणजे घटका घटकीं कौतुक करित असते असं वाटतं. अल्पवयांत किती तरी प्रौढ विचार, किती गोष्टी माहिती, जणुकाय पूर्व जन्मींच शिकून आला आहे. कोणती ही गोष्ट माझ्या शंकरास माहित नाहीं असंनाहीं. पर्वा मुंज झाली. पण अगदीं पोथींत ब्रम्हचाऱ्याचा धर्म सांगितला आहे तशी वर्तणूक अता बाई माधुकरीस गेला आहे केव्हां येतो काय कीं. ऊन किती झालं आहे. पाय पोळत असतील. असो त्या सर्वेश्वरास करूणा.

( इतक्यांत पडद्यांत " भवति भिक्षांदेहि " असा शब्द होतो. )

**अंबाबाई**--( ऐकून ) अग बाई आला वरं.

( तदनंतर बटुवेषधारी श्रीशंकराचार्य प्रवेश करितात. )

**शंकराचार्य**--आई ही माधुकरी. कोठे ठेऊं?

**अंबाबाई**--बाळा ठेव तिथं ( शंकराचार्य भिक्षापात्र ठेवितात. ) बाळा, कशालारे रोज रोज माधुकरीस जातोस ? घरांत काय कमी आहे?

**शंकराचार्य**--आई, घरांत कमी आहे म्हणून काय मी माधुकरीस जातो? माते, ब्रह्मचाऱ्याचा धर्मच तसा आहे. भिक्षान्न सेवन करून गुरुगृहीं वेदाध्ययन करावं, दिवसां निजूनये वहनावर बसूंनये, तांबूलभक्षण करूंनये सर्वदा गुरुसेवेंत असावे. असें आहे म्हणून मी तदनुरूप आचरण करितों.

**अंबाबाई**—( त्यास पोटाशीं धरून ) बाळा, कुठेरे इत
शिकलास ज्ञान! ( गहिंवरून ) काय करूं देवा, अशा स
गुणी पुत्रास सोडून कसरे त्यानां जाववलं? ( डोळे पुसून
बरं बाळा आतां मला तुझीच काय ती आशा. तुझं एक
लग्न होऊन, तुला चार मुलं बाळं झालीं, म्हणजे माझे स
गळे हेतु पुर्ण झाले.

**शंकराचार्य**--आई. तूं मला लग्न करण्यास सांगतेस काय
छे, छे तसलें भलते मी कधीं ही करणार नाहीं. आहे का
त्यांत ! आई सर्व विषय मिथ्यत्व पावतात, मग तदधिष्ठा
जी स्त्री, तिजपासून सुखेच्छा ती काय ?

**अंबाबाई**—तर मग तूं काय करणार ? असं भलतं
बोलूं नये बाळा.

**शंकरार्य**--आई मी संन्यास घेणार तर मला तूं आज्ञा दे.

**अंबाबाई** अरे हेंच कां तूझं शहाणपण! मी मोठा तुला सू
ज्ञ सूज्ञ म्हणत होतें, त्याचाच कां हा प्रकाश? अरे ही दुर्बुद्धी
तुला कुणी शिकविली? बाळा इतक्यांत संन्यास घेऊन या संसा-
राची सारी माती करणार काय ? ( संतापुन ) अरे या कु-
ळाचा दीपक तूंच आहेस, आणि हीं अशीं अक्षरे जर पुनः
बोललास तर मी जीभ हांसडून तुझ्या पायांत प्राण देईन
मग काय हवं तें कर.

**शंकराचार्य**—[ मनांत ] ही अज्ञानतिमिरानें वेष्टिलेली
आहे. तेव्हां अशी आज्ञा देणार नाहीं. याला कांहीं तरी क-
पटच केले पाहिजे. बरें असो. ( उघड ) नाहिंग आई उगी
च थट्टेनें बोललो. तितके देखील तुझ्यानें सहन करवलें नाहींना ?

**अंबाबाई**—( पुनःजवळ घेऊन ) असं नव्हे, बाळा, ती.

गोष्ट येव्हांच करायची नव्हे. संसारसुख सारं घेतलंस, आणी दोन मुलं बाळं झालीं, म्हणजे माझ्या मागें, तुझ्या म्हातार पणांत पाहिजे तर तसं कर.

**शंकराचार्य**—बरें तसें कां होईना. जाऊंदेग आई आतां ती गोष्टच काढूंनको. आइ, माझी माध्यान्हस्नानाची वेळा झाली तशांतून आज भानुसप्तमी आहे. तर मी नदीसच स्नानास जातो.

**अंबाबाई**—नको बाळा घरींच लवकर स्नान करून जेव. नदीचीं स्नानं काय रोज चालठींच आहेत.

**शंकराचार्य**—बर तरी आतां जाऊन येतों ( असें म्हणून चालूं लागतो )

**अंबाबाई**—पण फारवेळ डुंचूनकोस हो लवकरये. जर उशीर केलास तर पुनः कधींहि जाऊं देयाची नाहीं.

**शंकराचार्य**—बरें आहे. ( असें म्हणून निघून जातात )

**अंबाबाई**—कितितरी माझ्या धाकांत आहे. मी अमळ रागं भरलें कीं तेव्हांच घाबरतो. बर पण त्याला हें संन्यास घेण्यास वेड कुणींशिकविलं असेंल? ( विचार करून ) हं समजलें. हेंसगळं, त्या शाळेंत म्हणायास जातो त्याचं फळ. अगोदर ती शाळाच मला बंद करविली पाहिजे. पुरे मेली झाली इतकी विद्या. आतां त्याला प्रपंचाकडे लावावा म्हणजे इकडलं कांहीं लक्ष लागेल.

( इतक्यांत रडत सुबुध्ध येतो )

**अंबाबाई**—( घाबरून ) अरे रडत कां आलास ? काय

बाई तरी चिन्ह पाहा. अर्धा भिजला आहे निकाय रे ही तऱ्हा ! अरे, रडतोस कां बाबा.

**सुबुध्ध**—( कांपत कांपत ) क. क. क. क. काकी, मी आणि श. श. शंकर नदीस स्नानास गे. गे. गेलों होतों. मग स्नान क क करीत असतां, श. श. शंकरचा पाय मोठ्या सु. सु. सुसरीनें धरिला. आम्हीं तिनें सो. सो. सोडावें, ह्मणून पुष्कळ इलाज के. के. केले. प. प. पण. तो सोडीना. मग मी तसाच इकडे ध. ध. घ. धांवत आलों. श श. शंकर रडत पाण्यांत उभा आहे. ल. ल. लवकर चल.

**अंबाबाई**—( छातीवर हात आपटून ) देवा कायरे हें संकट ? आतां माझा पुत्र मला पुन: दिसेल काय ? मेल्यानो डुंबायाला गेला कशाला ! बरं चल, चल कुठंआहे तो मला दाखीव अगोदर. ( कंबरेवर हांत ठेऊन उठून ) माझी तर हें ऐकून कंबरच खचली.

( असें ह्मणून दुःख करित दोघें निघून जातात )

---

# प्रवेश ७

( तदनंतर, सुबुध्धाचा मित्र सुलोचन येतो. )

**सुलोचन**—( आपल्याशींच ) काय करावें; आज कितीएक दिवस माझा प्रिय मित्र सुबुध्ध मला भेटला नाहीं, म्हणून मी आज येथें स्वत: आलों, तरी त्याचा कोठें माग मूस नाहीं हें काय असेल बरें ?

( इतक्यांत खिन वदन करून सुबुद्ध येतो. )

**सुलोचन**—( प्रेमानें त्यास भेटून ) मित्रा सुबुद्धा, आज तूं असा उदास कां दिसतोस ? तूं सदा आनंदी असावयाचा पण आज तूं खिन्न कां ?

**सुबुध्ध**—काय सांगु मित्रा, आज माझ्या सर्व सुखांचें मूळच नाहींसें झालें.

**सुलोचन**--अरे असें काय म्हणतोस. सर्व वर्तमान सांगतरीं कारण आपलें दुःख मित्रास सांगितल्यानें कांहींसें कमी होतें.

**सुबुद्ध**—गुरूजी निवर्तल्याचें तूं तर ऐकिलेंच असेल.

**सुलोचन**—हो, हो, सूर्यास्त झाल्याचें कोणास कळणार नाहीं ?

**सुबुध्ध**—नंतर त्यांचा पुत्र व माझा मित्र जो साक्षात शंकरावतार तो आज आम्हांस सोडून निघून गेला. ( असें ह्मणून रूदन करूं लागतो. )

**सुलोचन**—अरे असें काय ह्मणतोस " निघून गेला " या संदिग्ध भाषणानें माझें हृदय फुटतें, सर्व काय असेल तें स्पष्ट सांग.

**सुबुध्ध**—काय सांगू; तो भगवान जगदाधर आम्हांस लाभणार काय? अरे मित्रा त्याच्या मनांतून संन्यास घ्यावयाचा याकरितां त्याणें आईपाशी एकवेळ आज्ञा मागितली परंतु ती मिळाली नाहीं, म्हणून आज आम्ही उभयतां स्नानास गेल्यावेळीं मायानक्र उत्पन्न करून त्याणें आपणास धरिलें आहे, असें दाखवून ओरडूं लागला.

**सुलोचन**--मग काय झालें!

**सुबुध्ध**-- मग मी धांवत येऊन काकीस सर्व विदीत कीरतांच ती ओरडतच तेथें गेली; आणि उदकांत पुत्र आहे, व आपला उपाय कांहींच चालत नाहीं, म्हणून तिनें फारच आकांत मांडिला.

**सुलोचन**—बरें पण त्यांतून सुटला कीं नाहीं हें सांग आधीं.

**सुबुध्ध**—सर्व सांगतो ऐक. नंतर आईस पाहून तो उदकांतूनच म्हणाला. "आई मी तर आतां मरतोच. परंतु संन्यास घेण्यास जर मला या वेळीं आज्ञा देशील तर कदाचित मी संन्यासाविषयीं संकल्प करितांच पुनर्जन्म होऊन वांचलों तर वांचेन."

**सुलोचन**--य: कायहो युक्ती ही. बरें मग!

**सुबुध्ध**—मग ती भोळी माता," आज्ञा जर न देईन तर हातचें असलें पुत्ररत्न जातें," अशा या दोन विचाराच्या कचाट्यांत सांपडून, कांहीं सुचेनासें होतांच वेड्या सारिखी चहूकडे टकमका पाहूंलागली.

**सुलोचन**—अरेरे! काय दारुण प्रसंग. मित्रा सुबुध्धा, त्या वेळेस त्या माउलीला कसें झालें असेल याचा विचार करूं लागलों कीं आंगावर शहारे येतात. बरें मग!

**सुबुध्ध**—नंतर आपली माता पुत्र मोहानें अतिवश्य झाली असून तिला काय बोलावे हें सुचत नाहीं असें जाणून तो भगवान मोहाविरक्त, ममताशून्य असा असतां त्याच्याही नेत्रांतून अश्रुपूर आले, परंतु तात्काळ तें नाहींसे करून " माते सत्वर कायतें सांग. नक्रपीडा मासानें सहन करवेना." असें तो मायाचालक मोठ्यानें ओरडला.

**सुलोचन**--हर हर ! ममतापाशच्छेद करण्याचा परम कठीण आहे. बरें, मग!

**सुबुध्द**--नंतर, तिणें, "हा माझा पुत्र संन्याशी होऊन त-री सुखी असो" असें ह्मणून, हातांत उदक घेऊन संन्यासा विषयीं आज्ञा दिली.

**सुलोचन**--मगतरी नक्रापासून मुक्त झाला काय !

**सुबुध्द**--हो अरे, त्याकरितांच तें कपट त्यानें केलें होतें आज्ञा मिळतांच नक्र नाहीं, कांहींनाहीं; लागलाच वर येऊन आईपाशी उभा राहिला.

**सुलोचन**--शांतझालों आतां; एकून त्या अरिष्टांतून बांच-लाना? पुढें?

**सुबुध्द**--मग आईनें पुन: "मी जाऊंदेणार नाहीं" ह्म-णून आग्रह धरिला. त्यकाळीं तिला ज्ञानोपदेश करून व अं-तकाळीं तुला दर्शन देईन ह्मणून सांगून, सर्व द्रव्य भाऊचं-दास देऊन आईची व्यवस्था त्यांस सांगून निघून गेला. ( गहिंवरून ) आतां मी मात्र अनाथ झालों.

**सुलोचन**--बरें पण तुझें आणि त्या सत्पुरुषाचें सख्य होतें मग तूं त्यास आपणा विषयीं विचारावें कीं नाहीं!

**सुबुध्द**--नाहीं असें कसें होईल. त्यावेळीं मी रडूं लागलों त्यावेळीं माझ्याजवळ येऊन, माझें समाधान करून, मला सां-गितलें कीं मी संन्यास घेउन काशीस येईन त्यावेळीं " तं मला भेट ह्मणजे तुझा उध्धार करीन."

**सुलोचन**--तर मग तूं काशीस येत असलास तर मीहीं

येनों अशा पुण्यपुरुषाच्या सहवासा सारिखें दुसरें कोणतें सौख्य आहे !

सुबुद्ध--मीतर हा चाललों तूंही येणार तर ये.

( असें बोलून दोघे निघून जातात. )

---

## प्रवेश ८.

### स्थळ—हिमाचल पर्वत.

( तदनंतर आसनस्थ गोविंदपूज्य पादाचार्यस्वामी प्रवेश करितात. )

**गोविंदपूज्य**--नारायण, नारायण, ( असें म्हणून आपल्याशींच ) काल समाधिकालीं, उद्यीक जो शिष्य येईल, त्यास आश्रम द्यावा. असी ईशाज्ञा झाली आहे. पण अद्यापि कोण तो येतनाहीं हें कसें !

( इतक्यांत शंकराचार्य येतात. )

**शंकराचार्य**-- ( आपल्याशींच ) मी आईची आज्ञा साधून, निघाल्या पासून अनेक वनें उपवनें क्रमण करीत या हिमाचलावर येऊन गुरूजीच्या गुहेचा शोध केला. आतां एका तपस्व्यानें सांगितलेली खूण या गुहेवर दृश्यहोते. तस्मात् या गुहेंतच ते माहायोगी असतील. ( असें म्हणून कांहीं पावलें चालून ) धन्य, धन्य, हीच ती गुहा. हेचमाझे गुरुवर्य बसले आहेत. असो आतां चरणीं लीन व्हावें.

( असें म्हणून जवळ येऊन चरणांवर मस्तक ठेवितो. )

**गोविंदपूज्य**--नारायण, नारायण, अरेबाबा तूं कोण आ-हेस !

**शंकराचार्य**--पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, या पंच माहा भूतांहून निराळा जो आत्मा तो मी आहे.

**गोविंदपूज्य**--वः, एकून याचा अधिकार मोठा दिसतो. हे बटो तुझें नाव काय ?

**शंकराचार्य**—सत्गुरु, या पंचभौतिक देहास शंकर ही संज्ञा आहे.

**गोविंदपूज्य**--शाबास हे शंकरा, तुझी काय इच्छा आहे ! तसेंच या अल्पवयांत, असल्या या घोरतपोवनांत येणें किमर्थ केलेंस !

**शंकराचार्य**—माहाराज, मी संसार तापेकरून फार पि-डित झालों अहे, एतदर्थ तन्नाशक जो चातुर्थाश्रम तो घे-ण्याकरितां या चरणापाशीं आलों आहे. तर माझी तेवढी इच्छा परिपूर्ण करावी.

**गोविंदपूज्य**-- ( हंसून ) तूं म्हणतोस तें सत्य आहे; प-रंतु तुझें हें वैराग्य कडे पर्यंत टिकणार नाहीं कारण, भोगादिकें करून इंद्रियशांति झाल्यावांचून, तीं स्वायत्त होणार नाहींत. या करितां तूं म्हणतोस ती दीक्षा घेण्याचें हें तुझें वय नव्हे.

**शंकराचार्य**- ऐंद्रजाल विद्येच्या प्रभावानें जाहालेल्या च-मत्कारास बालकें मोह पावतात, परंतु हें इंद्रजाल आहे असें मानणाऱ्या प्रौढास त्या पासून कांहींच होत नाहीं. तद्वत मिथ्या जो इंद्रियगण त्यां पासून सत्य विकार हो-ईल कसा ! तेव्हां गुरूजी जे म्हणतात त्या विषयीं भीती, गुरू-कृपा असेल तर मी किमपि बाळगणार नाहीं.

**गोविंदपूज्य**•—असो, तूं कोण आहेस हें मीं जाणिलें आहे; तेव्हां तुला मी उपदेश करावा असें नाहीं. बरें आहे तुला उपदेश करितों, पण गंगेवर जाऊन मुंडण करून घेऊन लवकर यावें.

( नंतर शंकराचार्य आंत जाऊन येतात )

**शंकराचार्य**—माहाराज आज्ञे प्रमाणें तो विधि उरकून आलों.

**गोविंदपूज्य**•—आतां हीं वस्त्रें परिधान कर ( असें ह्मणून भगवीं वस्त्रें परिधान करवितात ) दक्षिण हस्तांत हा दंड धारण कर. ( असें म्हणून दंड देतात. ) येणे करून काम क्रोधादि जे शत्रू आहेत त्यांचें दमन करावें. आतां उजवा कर्ण इकडे कर म्हणजे तत्वोपदेशक मंत्राचा उपदेश करितों ( असें ह्मणून शंकराचार्यांच्या सव्य कर्णांत उपदेश करितात ) आतां 'नारायण' असा मोठ्यानें उच्चार कर.

**शंकराचार्य**—( मोठ्यानें ) नारायण, नारायण, नारायण, ( असें म्हणतात. )

**गोविंदपूज्य**•—आतां तुला या आश्रमाचे धर्म सांगतों ऐक:— एका ग्रामांत चिराश्रावर राहूंनये, कोरडी भिक्षा देऊंनये, रजस्वला स्त्रियांचें मुख पाहिलें असतां ते दिवशीं उपोषण करावें, द्रव्यसंचय करूंनये, यानांवर बसुंनये या प्रमाणें धर्म आचरून अहर्निश ब्रम्हतत्वाचा विचार करीत जावा, आणि मुमुक्षु जे असतील त्यांस उपदेश करून त्यांचा उद्धार करावा. चातुर्मास्यांत मात्र चार पक्ष म्हणजे दोन महिने एका ग्रामांत वास्तव्य करावें. त्या दिवसांत तीर्थयात्रा करण्यास जाऊंनये.

**शंकराचार्य**--आज्ञेप्रमाणें वर्तन करितों, गुरुवर्यांचा कृपाकटाक्ष मात्र या शिष्यावर पूर्ण असावा.

**गोविंदपूज्य**—तूं माझा पट्टशिष्य आहेस. तुला, भगवत्पूज्यपादाचार्य असें आश्रमनाम मी देतों. आतां तुला गुरूपरंपरा सांगतों ऐक;— मूळ अद्वैताचार्य श्री व्यासोनारायण हे होत, त्यांचे शिष्य श्री शुकाचार्य, त्यांचे श्री गौडपादाचार्य, त्यांचा मी व माझा तूं ( भगवत्पूज्यपादाचार्य ) अस्तु. तूं साक्षात् शंकर आहेस. मनुष्यदेह धारण केल्यावर, तदनुसार करणी केली पाहिजे, म्हणून या लीला करितोआहेस; हें मी स्पष्ट जाणतों.

**शंकराचार्य**—आपण सर्वज्ञच आहां. आपणास विदीत नाहीं असें काय आहे ?

**गोविंदपूज्य**०—हे मत्प्रिया भगवत्पूज्या, आतां तूं, मुमुक्षूंचा उद्धार करण्या कारितां पृथ्वीवर संचार करावा.

**शंकराचार्य**--सद्गुरो कांहीं दिवस या हस्तें गुरुसेवा घडावी, अशी इच्छा आहे, तर आश्रमांत राहण्यास मला आज्ञा असावी.

**गोविंदपूज्य**—फार उत्तम खुशाल राहा. आतां माध्यान्हिक सारण्यास गंगातीरीं जाऊं, ( असें म्हणून उभयता निघून जातात. )

## प्रवेश ९

### स्थळ—काशिक्षेत्र.

( तदनंतर शंकराचार्य प्रवेश करितात. )

**शंकराचार्य**--( आपल्याशींच ) मी तर गुरूची आज्ञा घेऊन या पवित्र क्षेत्रीं आलों आहे. आतां आपल्या इच्छे प्रमाणें कधीं योग येतो पाहवें वः काय हो ही गंगा स्वच्छ आहे खरी, जिचें पाणी स्फटिका सारिखें असून अमृतवत रुची देत आहे शाचास या गंगेचें पान करणारे हे येथील लोक कितीं तरी धन्य आहेत. असो, माझें तर स्नान झालें-च. आतां श्री विश्वराचें दर्शन घेण्यास जांव ( असें म्हणून दोन पावलें जाऊन पुढें पाहून ) हर हर ! कितो तरी अमं-गळ चांडाळ आहे. ज्याणें हस्तांत मांसपात्र घतलें आहे, ब-रोबर चार श्वान आहेत, आंगाची दुर्गंधी येथपर्यंत येत आहे. शिव शिव ! याची छाया देखील घेऊंनये. ( असें म्हणून एका बाजूनें चालूं लागतात. )

( तदनंतर वर्णन केल्या प्रमाणें चांडाळ वेष घेऊन श्री विश्वेश्वर प्रवेश करितात. )

**शंकराचार्य**—अरे हा आंगावरच येतो कीं, कितो तरी, उद्दाम आहे हा ( त्यास ) अरे चांडाळा मला शिवशील. वाट सोडून एकीकडून चाल.

**चांडाळ**--( तें न ऐकतां त्यास जाऊन धक्का देतो. )

**शंकराचार्य**--( कंटाळून ) अरेरे, दुष्टानें स्पर्श केलाच शे-वटीं, आतां पुनरपि स्नान केले पाहिजे. ( त्यास म्हणतात ) अरे मला शिवलास यांत काय तुला मिळालें.

**चांडाळ**—( हंसून ) अरे तूं कोण आहेस.

**शंकराचार्य**—मी ब्राम्हण आहे, व जे चांडाळाचा स्पर्श झाला असतां स्नान करितात.

**चांडाळ**—अरे तूं जातीनें ब्राम्हण आहेस किंवा गुणानें ?

**शंकराचार्य**--पदार्थ आणि त्याचे गुण यांमध्ये पृथकता नसतेच त्या पेक्षां जर मी ब्राम्हण आहें तर तद्गुण माझे ठायीं आहेत. असेंच समजलें पाहिजे. तेव्हां मी दोहीं कडून ब्राह्मण होय.

**चांडाळ**--तर तुला ब्राम्हण या शब्दाचा अर्थ ठाऊक असला पाहिजे.

**शंकराचार्य**—हो, हो, ठाऊक आहे. ब्रम्ह जानातीति ब्राम्हण:

**चांडाळ**--तुला अर्थ ठाऊक आहे परंतु त्याचा अनुभव नाहीं. तो असता तर तुझ्या मुखांतून अशी असंबध्ध वाणी निघतीचना.

**शंकराचार्य**--" मला, शिवूनको. " या वाक्यांत असंबध्धता कोणची पाहिलीस ?

**चांडाळ**--अरे मूढा जो तुला शिवतो आहे, त्यास " शिवूनको " हें म्हणणें समजत नाहीं. व जो समजतो त्यास शिवणें किंवा न शिवणें हें माहीत नाहीं. तद्वतच " मला शिवुनको. " असें जो म्हणतो त्यास स्पर्श होतच नाहीं, व ज्यास होतो त्यास तो झाल्या बद्दल कांहींच कळत नाहीं. कारण तो जड आहे, आणखी, सूर्य प्रतीबिंब, गंगेंत व सुरेंत सारिखें पडतें म्हणून त्या प्रतिबिंबास उच्च नीचत्व आहे काय ? तद्वत आकाशवत् व्याम जो आत्मा तद्रुपा ब्राम्हण आणि

चांडाळ हा भेद मुळींच नाहीं. असें असून, अभेद दृष्टीचा ढोल घालूनआंतून अशी भेद बुद्धीचीं आचरणें करणारास ब्राम्हण म्हटल्या पेक्षां पशू म्हणणें फार चांगलें नव्हेकाय ?

**शंकराचार्य**--( आपल्याशींच ) अरे हा चांडाळ नव्हे. कारण, या नीच मुखांतून अशी वाणी, व असे सद्विचार, कधींही निघावयाचे नाहींत. तस्मात हा वेषधारि चांडाळ असावा. असो ( उघड ) जग आणि ब्रह्म यांचें नीरक्षीरवत् मेळन असून हंसवृत्तीनें त्यांतून ब्रम्हक्षीराचा अनुभव घेणारा, व ज्याची अशी अभेदबुद्धी असेल, तो चांडाळ असो, यवन असो, जातीनें महानीच असो, तो माझा वंदनीय गुरू होय. ( असें म्हणून चांडालाचे पाय धरण्यास वाकतात. तोच विश्वेश्वर चांडाळाचा वेषटाकून प्रत्यक्ष मुर्तीनें प्रगट होतात, व चांडाळ नाहींसा होतो. )

**विश्वेश्वर**--हे मंदशा शंकराचार्या ऊठ. तूं माझा अवतार पूर्ण आहेस किंवा नाहीं हो परिक्षा पाहाण्याकरितां मी हा वेष घेऊन तुला स्पर्श केला. अस्तु तूं मला जाणिले आहेस येणें करून मीं प्रसन्न आहे.

**शंकराचार्य**--( वर उठून पाहून पुन: नमस्कार करून ) हे भगवन् पार्वतिप्राणवलभ, चराचर गुरो, मी आपल्या परिक्षेंत कसा टिकणार आहे ! क्षुब्ध झालेल्या भयंकर समुद्रांत जशा प्रचंड पाण्याचा लाटा एकामागुन एक येतात तद्वत या भवार्णवांत, त्वध्धीन जी माया तिचे तरंग येताहेत. ते कशाही तत्ववेत्त्यास भुलावितात. मग माझी कथा काय ? जाच्यावर आपली कृपा आहे, त्यास मात्र त्या मायाजाला पासून कांहीं होत नाहीं. तर हे भगवंन्, या संसार सागरांत

नाशनव्य करणारे जे कामादि क्रूर पशु, त्यांचे मंथन कर-ण्यास आपलें कृपाखड्ग मजपाशीं असावें.

**विश्वेश्वर**—अरे हें काय बोलतोस, सर्व मत्रिस्तच त्वद्-धीन आहे; मग तदंतर्वर्ती कृपा असेल यांत नवल काय !

**शंकराचार्य**—आपण बोलतां हें सत्य आहे. कारण, देहदृ-ष्टीनें मी आपला दासानुदास आहे, व जीवदृष्टीनें मी आ-आपला अंशभूत आहे, आणि आत्मदृष्टीनें मी साक्षात भव-द्रूप आहें.

**विश्वेश्वर**—शाबास, धन्य आहेस. कृतकृत्य आहेस. हे शंकराचार्या जसा व्यासेनारायण, तसा तूं ही मला प्रिय आहेस. ज्या ज्या वेळीं धर्मग्लानी होऊन अ धर्मवृद्धी होते, त्या त्या वेळीं मी असाच अवतार घेऊन धर्म स्थिती करितों. अस्तु, आतां तुझें कर्तव्य सांगतों ऐक:–श्री व्यासांनीं, सर्व श्रुतीचें तात्पर्य उपनिषद्वारें वर्णिलें आहे, त्याचा, मूढ पंडित, नाना कुतर्के क-रून भलताच अर्थ करितात, तर त्या सर्वांचें खंडन ज्यांत होईल असें, व्यासोपनिषद्वांवर माहाभाष्य करावें. नंतर माहाकर्मठ जो मंडनमिश्र त्यास जिंकून दिग्विजय करावा, व द्वैतवाद्यांस जिं-नकू ब्रम्हाद्वैतमत स्थापन करून जगद्गुरुत्व मिळवावें. आतां मी अंतर्धान पावता.

**शंकराचार्य**—( नमस्कार करून ) माहाराज विद्यानिधे! आपण पाहिजे त्या पासून पाहिजे तें करवाल. आज्ञे प्रमाणें सर्व करितों; परंतु मी केलेलें भाष्य पाहून शुद्ध करण्यास पुनरपि एकवार दर्शन झालें पाहिजे.

**विश्वेश्वर**—तुझें भाष्यकरून झालें म्हणजे तुला व्यासच

भेटतील व तेच शुद्ध करितील. अस्तु आतां मी गुप्त होतो ( असें म्हणून निघून जातात. )

**शंकराचार्य**—व्हावा ! आज ईशदर्शन झालें येणेंकरून आत्मा प्रसन्न झाला. आतां ईशाज्ञे प्रमाणें वर्तन करणें आहे तर त्य उद्योगास लागावें ( असें म्हणून निघून जातात. )

संन्यास ग्रहणेषु दर्शनों नाम तिसरा अंक समाप्त.



# अंक ४.



## येणारी पात्रें.

---

| | | |
|---|---|---|
| १ पार्वती | .... .... | शंकराची स्त्री |
| १ लक्ष्मी | .... .... | विष्णुची पत्नी. |
| ३ जटाधर | .... .... | शिवाचा गण. |
| ४ पद्मपादाचार्य<br>५ आनंदगिराचार्य | } | शंकराचार्यांचे शिष्य. |
| ६ शंकराचार्य | .... .... | जगद्गुरु (शिवाचाअवतार) |
| ७ हस्तामलाचार्य<br>८ त्रोटकाचार्य | } .... | शंकराचार्यांचे शिष्य. |
| ९ लवंगिका<br>१० बकुलिका | } .... | मंडनमिश्राच्या दासी. |
| ११ मंडनमिश्र | .... | ब्राह्मणपंडित<br>( ब्रह्मदेवाचा अवतार ) |
| १२ व्यास | .... .... | वेदव्यास ( सूत्रकार ) |
| १३ जैमिनी | .... .... | त्यांचे शिष्य. |

१४ कृष्णमिश्र .... .... मंडनमिश्राचा शिष्य.

१५ सरस्वती .... .... मंडनमिश्राची भार्या.

१६ कौस्तुभपंडित } दोन ब्राह्मण पंडीत.
१७ शिलादपंडित }

# अंक ४.

## प्रवेश १.

( स्थळ—कैलासपर्वत. )

( तदनंतर आसनस्थ पार्वती व लक्ष्मी प्रवेश करितात. )

**लक्ष्मी**—पार्वतीबाई पर्वा मी तुम्हांस भेटावयाला आलें होतें, त्यावेळीं तुम्हीं चाललेली एक गोष्ट अर्धीच सांगितलीन, आणि बाकीची " मग सांगेन " असं म्हटलंत ती ऐकण्यास आज मी मुद्दाम आलें आहे, तर तेवढी सांगा कशी.

**पार्वती**—अशी कोणचीहो गोष्ट ती माझ्या बाइ नाहीं ध्यानांत.

**लक्ष्मी**—आहो आपल्या प्राणनाथांनीं मृत्युलोकीं अवतार घेऊन चमत्कारिक कृती आरंभिल्या आहेत, त्यांची गोष्ट तुम्हीं मला नव्हतां का सांगत ? असें का मुद्दाम वेड पांघरतां !

**पार्वती**—( हंसून ) हं हं ती गोष्ट होय ? पण कोठपर्यंत तुम्हीं ऐकलीत ! तें सांगा.

**लक्ष्मी**—आपल्या माहाराजांनीं, आपल्या मातेला फसवून संन्यासाविषयीं आज्ञा मिळविली, इथपर्यंत ऐकिली. पुढची सांगा आतां.

**पार्वती**—मलाहि पण तेवढीच ठाऊक होती; पुढें काय झालं अद्यापी मलाही कळलं नाहीं.

**लक्ष्मी**—हेंहो काय ? तुम्हीं सांगाल ह्मणून मोठी आशा करून आलें होतें. पण बाई व्यर्थ केलंतना ?

**पार्वती**—अंमळ थांबा. पुढलं वर्तमान काय हें समजावं ह्मणून दोन गण मी याच कामाकरितां पाठविले आहेत, ते आतां येतील त्यांच्यापासूनच ऐका म्हणजे झालं.

तदनंतर जटाधर यानांवांचा शिवगण
प्रवेशकरितो. )

**जटाधर**—( जवळ येऊन ) मातोश्री, उभयतांच्या पादकमलीं मी जटाधर अभिवादन करितों. ( असें म्हणून नमस्कार करितो. )

**पार्वती व लक्ष्मी**—कल्याण असो.

**पार्वती**—अरे जटाधरा तूं एकटाच आलास, आणि तो पिंगाक्ष कोठें आहे.

**जटाधर**—मातोश्री आपल्याआज्ञे प्रमाणें मनलीं आम्हीं गेलों. व तातमहाराजांच्या लीला प्रत्यक्ष पाहाण्या करितां आदृश्यरूपें त्यांच्या पृष्ठभागींच होतों; नंतर ज्या ज्या पाहिल्या त्या त्या निवेदन करण्याकरितां मी आलों, आणि पुढेंकाय होतें हें पाहाण्यास्तव पिंगाक्षास तेथेंच ठेविलें आहे.

**पार्वती**—बरंतर संन्यासाविषयीं आज्ञा मागून जाणें झाल्या वर पुढें काय वर्तमाम झालं तें सांग.

**जटाधर**—मातोश्री लक्षपूर्वक ऐकावें:- संन्यास घेहणाविषयीं मातेची आज्ञा मिळतांच एकटेच वनें उपवनें क्रमण करित करीत चालले. परंतु, आश्रम घेण्यास गुरूच मिळेना त्याकालीं परम चिंतातुर होऊन ईश्वराचें स्तवन करीत, हिमाचलाचे पाव-

थ्याशीं जें निबिड अरण्य आहे तेथें निराशपणें तातमाहाराज ब- सते झाले.

**पार्वती**—अरे कायहा चमत्कार. एवढ्या त्या पृथ्वीवर संन्यास घेण्यापूर्वी एकही कां संन्याशी मिळाला नाहीं !

**जटाधर**—जगदंबे, ऐका:- माहाकर्मठ मंडनमिश्र, संन्याशी पाहिला कीं त्यांस जिकून त्याचें लग्न करितात या भीतीनें सर्व संन्याशी गुप्तपणें वास करितात.

**पार्वती**—असो पुढें काय झालं तें सांग.

**जटाधर**—त्यावनांत इश्वराचें ध्यान करीत तातमाहाराज ब- सले असतां, " हिमाचलाच्या गुहेंत गोविंदपूज्यापादाचार्य म्हणून माहायोगी आहेत त्यांजपासून संन्यास घ्यावा. " असा दृष्टांत झाला.

**पार्वती**—( हंसुन ) लक्ष्मीबाई, वेडीच सोंग घेतलं म्हणजे पा- टाव फाडला पाहिजे अशी म्हण आहे नव्हे कां ? बरं पुढें !

**जटाधर**—मग त्या गुहेचा शोध करीत हिमाचलावर गेले, तथें कांहीं ऋषींनीं त्या गुहेची खुण सांगितली त्याप्रमाणें ती गुहा शोधून काढून, गुरु गोविंदपूज्यांची गांठघऊन त्यांपासून संन्यास घेते झाले.

**पार्वती**—( खिन्न मुद्रा झाली ती लपवून ) नंतर काय झालं ?

**लक्ष्मी**—पण पार्वतीबाई तुम्हीं कां वाईट तोंड केलेंत !

**पार्वती**—पुरेहोबाई तुमची थट्टा. ( गणास ) मगकाय झालं ?

**जटाधर**—नंतर त्यांच्याच आश्रमांत गुरुसेवा करण्या क- रितां तातमाहाराज राहिले. मग कितीएक दिवस सेवा केल्यावर तातमाहाराजांनीं मोठाच चमत्कार केला.

**पार्वती**—तो कोणचा सांग लवकर.

**जटाधर**—आज्ञा. ऐकावें:– एक दिवस गंगातीरीं गोविंद-पूज्य समाधि लावून बसलेअसतां, गंगेचा घों घों असा प्रचंड शब्द चालला होता. तेणेंकरून गुरूच्या समाधीस त्रास होईल असें समजून, तातमाहाराजांनीं सर्व गंगा आपल्या कमंडलूंत भरून गंगाप्रवाहच बंदकेला.

**पार्वती**—जांनीं आपल्या जटेंत बिंदुरूप केली, त्यांस कमंड-लूंत नाहींशी करणं काय अवघड आहे ! बरं पुढें !

**जटाधर**—नंतर हे सर्व गुरूंस कळतांच त्यांनीं, तातमा-हाराजांस, " आतां सेवा पुरे. अवतारचरित्र सांगकरण्याक-रितां तूं जावें. " असें सांगून, ही पुढील कथा सांगितली.

**पार्वती**—ती कोणची ?

**जटाधर**—त्याकाळीं ते गोविंदपूज्यपादाचार्य म्हणाले. " मी एकदां ब्रह्मसभेंत गेलोंहोतों. तेथें आमचे आद्यगुरू श्रीव्यासही आले होते. तेव्हां प्रसंगानुसार व्याससूत्रांवर भा-ष्य झालें पाहिजे अशी गोष्ट निघाली. त्याकाळीं " गोविंद-नाथांच्या शिष्यांतून जो गंगाप्रवाह कमंडलूंत भरून नाहींसा करील तोच माझ्या सूत्रांवर यथार्थ भाष्य करील. " असें श्रीमद्व्यासांनीं सांगितलें. तस्मात् आतां तूं काशीस जाऊन उपनिषद्भाष्य करावें " अशी तातमाहाराजांस आज्ञा होतांच तातमाहाराज काशीस येतेझाले.

**पार्वती**—काशीस येऊन काय चरित्र केलें तें सांग.

**जटाधर**—काशींत आल्यावर, पद्मपाद, आनंदगिरी, इ-त्यादिकांस उपदेश करून शिष्यकरून घेतले. आणि जे जे भवरोग पीडित होऊन शरण येतात त्यांचा उद्धार करण्याकरि-

तों सातभाहाराज सांप्रत काशींतच र हिले आहेत. आतां पुढील वर्तमान काय होईल, तें कळण्यास्तव पिंगाक्षास तेथेंच ठेऊन, मी मातोश्रीस हें सांगण्याकरितां निघून आलों. [ असें म्हणून पुनः नमस्कारकरून स्तब्ध बसतो. ]

**पार्वती**—ऐकलतनां लक्ष्मीबाई ? आतां तो पिंगाक्ष आल्या म्हणजे बाकीचेंही कळेल,

**लक्ष्मी**—पार्वतीबाई, थोरांच्या लीला कितीजरी ऐकल्यातरी पुरे होतनाहींत, आतां बाई जातें मी. उद्यां येईन आणखी,

**पार्वती**—चला बाई. फार वेळ झाला तुम्हाला येऊन.

**लक्ष्मी**—तो पिंगाक्ष आला म्हणजे मी आल्यावांचून मात्र गोष्ट ऐकूनका सांगतें.

**पार्वती**—बरं आहे. तुम्हावांचून मी एकटी ऐकणारनाहीं, आणि जर ऐकलीच तर तुम्हास मी सांगेन समजलात, चला आतां,

( असें म्हणून सर्व निघून जातात )



## प्रवेश २.

### स्थळ—काशिक्षेत्र,

( तदनंतर आचार्यशिष्य पद्मपाद व आनंदगिर, असे दोन यती, नारायण, नारायण, असा शब्द करीत प्रवेश करितात. )

**आनंदगिर**—कांहो पद्मपादाचार्य, आचार्य उत्तरमानस यात्रा करण्याकरितां गेले त्या वेळीं बरोबर तुम्ही होतां; तेव्हां ति-

कडे काय काय चमत्कार पाहिले, सद्गुरु आचार्य कोठें आहेत, इत्यादि वर्तमानें तरी सांगा.

पद्मपाद--चमत्कार विशेष सांगण्या सारिखे कांहीं पाहिले नाहींत. तिकडील सर्व तीर्थांचीं स्नानें घडलीं सर्व देवतांचीं दर्शनें झालीं. ज्या ज्या क्षेत्रीं गेलों त्या त्या देवतेच्या आचार्यांनीं यथाविधी पुजा केल्या, नाना विधी स्तुती केल्या. हेंच. सारांश त्या सद्गुरूच्या सहवासानें दिवस परम आनंदानें गेले.

आनंदगिर--पण आचार्य कोठेंआहेत !

पद्मपाद--प्रयागाहून, " तुम्हीं काशीस चला मी मागून येतो. " असें सांगून योग मार्गे कोणीकडे गेले हें कळलेंनाहीं; तेव्हां आम्हीं सर्व आज्ञे प्रमाणें येथें आलों. बहुधा स्वारी आजच यावी,

आनंदगिर--अहो पद्मपाद, पूर्वीं आचार्य काशीस असतांना एक दिवस कोणी विप्रआला, त्याचा आणि आचार्यांचा वाद होऊन, शेवटीं कांहीं चमत्कार घडले असें मी ऐकितो. व ते इत्थंभूत वर्तमान तुम्हांसच माहित आहे असेंही कळतें तर तें मला कळविण्या जोगेंअसेल तर सांगा पाहूं.

पद्मपाद--अहो तुम्हांस नाहींच का अद्यापी समजलें तें ! सांगतों ऐकातर:- तेदिवशीं, आचार्य आम्हांस भाष्य पाठ सांगत असतां, जे विप्र आले ते श्रीवेदव्यास, समजलात ? त्यांचा व आचार्यांचा, भाष्यासंबंधीं मोठा वाद होऊन शेवटीं व्यासांनीं आचार्यास दर्शन दिलें, आणि आचार्यकृत भाष्याची मोठी प्रशंसा करून आचार्यांचें ही वर्णन केलें.

आनंदगिर--कृष्णद्वैपायनाचार्य काय ते ? अरेरे मला दर्शन झालें नाहीं म्हणून मोठें वाईट वाटतें मग ?

**पद्मपाद**—नंतर, ते जाऊं लागले त्याकाळीं आमच्या आचार्यांनीं प्रार्थना केलीकीं "भगवन् माझ्या आयुष्याचा शेवट जवळ आला तस्मात एक मुहूर्त मात्र आपण येथें असावें म्हणजे आपणा समक्ष देह विसर्जन करीन, कारण मला प्रालब्ध योगें सोळा वर्षेंच आयुष्य आहे,' आणि तीं तर आजच पूर्ण झालीं "

**आनंदगिर**—( आश्चर्य मुद्रेनें ) कायहो त्या सच्चिदानंदासही प्रालब्धानें सोडिलें नाहींना ! बरें मग ?

**पद्मपाद**—नंतर त्या वेदव्यासांनीं क्षणभर नेत्र झांकून विचारकरून सांगितलें कीं "हे शंकराचार्या अद्यापी तुझें कर्तव्य पुष्कळ आहे तस्मात तूं इतक्यांत अवतार समाप्त करूंनयेस. आतां दैवबलें आठ वर्षे आणि माझ्या सामर्थ्यें आठ वर्षे एकूण सोळा वर्षें तुला आयुष्य अधीक देतों तितक्या कालांत सर्व वादी जिंकून पृथ्वीचा दिग्विजय करून हें ब्रम्हाद्वैतमत स्थापन करावेंस; नंतर तुझ्या वयाच्या बत्तीस वर्षांच्या अंतीं निजधामास जावेंस. " याप्रमाणें सांगून ते भगवान् अदृश्य होते झाले.

**आनंदगिर**—एकूण एवढें हें कथानक तुम्हा वांचून कोणासच माहीत नव्हतें. आज हें ऐकून परमानंद झाला.

**पद्मपाद**—आचार्यांनीं, हें गुप्तच असावें अशी आज्ञा केली आहे.

( इतक्यांत पडद्यांत नारायण नामाचा गजर होतो. )

**आनंदगिर**—अहो आचार्य आलेसें वाटतें.

( तदनंतर कांहीं शिष्यांसह्वर्तमान शंकराचार्य प्रवेश करितात. )

**शंकराचार्य**—नारायण, नारायण, ( असें ह्मणून आसनावर बसतात. )

**पद्मपाद व आनंदगिर**—( हातांत दंड धरून यतीच्या सांप्रदायाप्रमाणें आचार्यास वंदनें करितात. व नारायण, नारायण, असें ह्मणतात. )

**शंकराचार्य**—( प्रीतीनें ) कां समस्त शिष्यांचें कुशल आहेना ?

**आनंदगिर**—भगवन आपल्या कृपाकटाक्षें सर्व कुशल आहों आपला वियोग कांहीं दिवस झाला होता, तेणें करून मात्र असमाधानता झाली होती, सांप्रत या चरण दर्शनें तीही नष्ट होऊन आनंद समुद्रांत बुडून गेलों आहों.

**शंकराचार्य**—पद्मपाद येथें केव्हां आला.

**पद्मपाद**—सद्गुरो आपली आज्ञा होतांच सर्व शिष्यांसह निघालों तों येथें सुखरूपपणें पोंहोंचलों. परंतु, आपले एकाकी गमन कोठें झालें होतें, या संशयांत सर्वत्रांच्या चित्तवृत्ती निमग्न झाल्या आहेत तर सद्गुरो आह्मांस तें कळविण्या जोगें असल्यास कळवावें, अशी, हे सर्व प्रार्थना करिताहेत.

**शंकराचार्य**—( हंसून ) इतकेंचना ! सांगतों ऐक.—मी प्रयागांत असतां कांहीं ब्राम्हणांच्या मुखें अशी वदंता ऐकिली कीं " जैनसंतान धूमकेतु भट्टपादाचार्य पश्चातापतप्त होऊन तुषाग्निप्रवेश येथून जवळच गंगातीरीं करिताहेत. " मग तुम्हांस इकडे जाण्यास सांगून मी योगशक्त्या तेथे गेलों

**आनंदगिर**—ज्याणीं जैनांस जिंकून त्यांचें निर्बीज करविलें तेच भट्टाचार्य काय ?

**शंकराचार्य**—हो हो तेच, व ज्यांस कुमारिलभट्ट अशी-हि संज्ञा आहे.

**पद्मपाद**--नंतर पुढें काय झालें माहाराज !

**शंकराचार्य**—मी तेथें गेलों त्यावेळीं तो कर्मकांड प्रवर्तक भट्टपाद, तुषाग्नि पेटऊन मध्यें उभा होता, व त्याचे प्रभाकरादि जे शिष्य तेही आसमंतात्भागीं दुःखकरीत उभे होते, त्या सर्वांचें समाधान करणारा, व ज्यानें मरणाचाच संकल्प केला आहे असा तो, दावानलपरिवेष्टित माहामहीधरा प्रमाणें शोभू लागला.

**पद्मपाद**--परंतु त्या सत्पुरुषावर, अशी विपत्ती भोगून प्राणत्याग करण्यासारिखें असें कोणचें संकट आलें होतें ?

**शंकराचार्य**--त्याला, आपण जैनशाळेंत शिकून त्यांचाच घात केला, तसेंच कर्म मार्ग प्रवर्तन व्हावें ह्मणून, वेदांतपर श्रुतीचा पांडित्यानें कर्मपर अर्थ केला, इत्यादि कर्मांचा पश्चाताप झाल्यामुळें, तुषाग्नि प्रवेशकरून ह्या पातकांपासून मुक्त व्हावें, असा त्या माहाभागानें निश्चय केला.

**पद्मपाद**--हर हर ! कायहो हा दुर्धर निश्चय ? पण गुरु, वर्य आपण तेथें गेल्याधर, त्यांचे मन त्या निश्चयापासून फिरवावयाचें होतें.

**शंकराचार्य**--नाहीं असें तूं कशावरून जाणिलेंस ! मी जातांच, "असें साहस करूंनकोस तूं काहीं अन्याय केलानाहींस." इत्यादि पुष्कळ बोध केला; तो न ऐकून, मी केलेलें भाष्य भजपासून घेऊन, तें गंभीरतेनें वाचून पाहून मोठ्या उद्गारानें बोलला.

पद्मपाद—( उत्सुकतेनें ) काय काय बोलले माहाराज !

शंकराचार्य—मला नमस्कार करून, "माझ्या मनांत या आपल्या भाष्यावर वार्तीक करायाचें होतें पण काय करूं मी तर देहत्यागाविषयीं संकल्प केला आहे. आतां मला राहतां येतनाहीं. असो आतां आपण मंडनमिश्राशीं वाद करून त्यास जिंकून शिष्य करून घ्यावें कारण ह्या भाष्यावर तोच वार्तीक करण्यास समर्थ आहे. आतां मी येतें सर्वत्रांनीं मजवर कृपा ठेवावी." असें म्हणून, भाष्याचें पुस्तक माझे हातीं देऊन, अग्नि प्रवेश करून प्राणत्याग करिता झाला.

—आनंदगिर—गुरु महाराज हें वर्तमान ऐकून सर्वत्रांच्या मनावर विलक्षण उदासीनता आली.

शंकराचार्य—असु. अवश्य जें भावीं तें कधींही चुकाववाचें नाहीं. पद्मपादा, मलातर कर्म मार्ग जिंकून ज्ञानमार्गाची स्थापना केली पाहिजे, तस्मात प्रथमतः कोणाबरोबर वाद करण्यास जावें ?

पद्मपादा—गुरु महराज; सांप्रत कर्म मार्ग प्रवर्तक, मंडनमिश्र हा मुख्य होय. तस्मात मला असें वाटतें कीं मंडन जिंकल्यानें सर्व जग जिंकिल्या प्रमाणें झालें. आणि तशांतून; भट्टाचार्य व श्रीमद्व्यास यांणीं ही त्यासच प्रथम जिंकण्यास सांगितलें आहे.

शंकराचार्य—पण माझ्यानें तो कर्मठ जिंकवेल काय ! त्याच्या पांडित्याची कीर्ती मी फारच ऐकितो. आणि तो सर्व शास्त्र विशारद असून, मीमांसा पूर्व कांड त्यास करतल प्राय आहे.

हस्तामलाचार्य—गुरुवर्य, कायही शंका? तिमिरा पासून सह-

आपणांस कांही तरी अडचण होईल काय ? महाराज, वेदांतावभ-विभाकर आपण कोणीकडे ! व सत्याचे ठायीं असत्याचा आरोप करणार, तो कमंठ कोणीकडे !

त्रोटकाचार्य—मला वाटतें आपलें हें अलौकिक स्वरूप पाहतांच तो गर्भगळीत होऊन, सिंहास पाहून उन्मत्त हत्तीचा जसा मद नाहींसा होतो, तद्वत होऊन तो आपणास शरणच येईल मग वाद तर लांबच राहिला.

शंकराचार्य—तुमचें हें पक्षपाताचें भाषण आहे सर्वांस आत्मीय सुंदर दिसतें हें योग्यच आहे. परंतु, त्या माहा पंडितांचे ज्ञान मी जाणतों. तो साक्षात ब्रह्मदेवाचा अवतार आहे. त्याशीं वाद करणारा या त्रिभुवनांत कोणी समर्थ नाहीं. असो ज्या अर्थी माझें कर्तव्यच तें आहे, त्या अर्थी मला त्याच्याशीं वाद केलाच पाहिजे. तर आतां त्याची नगरी जी माहिष्मती, तीप्रत जाऊं चला. ( असें म्हणून सर्व नारायण नारायण असें म्हणत निघून जातात. )

---

## प्रवेश ३.

### ( स्थळ—माहिष्मती नगरी )

### ( रेवातटाक )

( तदनंतर लवंगिका व बकुलिका या नांवांच्या मंडनमिश्राच्या दोन दासी प्रवेश करितात. )

लवंगिका—अग बकुळे आज तुजवर बाईसाहेबांचा फारच

गहजप झाला होता, तर असा तूं काय अपराध केलास ?

**बकुलिका**--छे गडे, मजकडून मोठीच चुकी झाली. मी आंगणांत उभी होतें आणि माझं लक्ष दुसरे कडे होतें, इतक्यांत बाईसाहेब तुळशीची पुजा करण्याकरितां आल्या; तोंच मी मागं सरकलें, आणि माझ्या लुगड्याचा पदर त्यांस लागला म्हणून मला फारच शिव्या दिल्या, दुसरं कांहीं नाहीं.

**लवंगिका**--हं, हं, समजलें. तू कधींना कधीं अशीच. तुझं लक्ष कोठें गेलं असेल तें मीं समजलें. तो मेला राम्या हुज-ऱ्या तिकडून आला असेल, दुसरं काय ?

**बकुलिका**--( किंचित लाजून ) अग लवंगे, तूं इतकी थेरडी झालीस पण अद्यापीं तुझी, भलतीच थट्टा करण्याची संवय गेलीनाहीं. तूं चौघांत असें बोलतेस, हें जर बाईसा-हेबांच्या कानांवर गेलं तर मग माझी काय अवस्था हो-ईल बरें !

**लवंगिका**--शाबासग शाबास, काय तें तरुणपण तुलाच आलं आहे. आह्मी काय तरण्या नव्हतों ? कीं अशा गोष्टी केल्यानाहींतना ? पण कोणास तरी कधीं कळलं आहे काय ? आणि तुझा, सगळ्या वाड्याभर डंका वाजतो आहे. बाई सा-हेब देखील पर्वा म्हणाल्या, " रामा आणि बकुळी यांचं इतकं रहस्य कां! " इतकं असून मलाच म्हणतेस कीं मीच थट्टा क-रून तुझं बाहेर काढितें. भली आहेस पण.

**बकुलीका**-- ( घाबरून ) अग बाई, खरंच कीं काय ! बाईसाहेबास कोणीं सांगितलं असेल !

**लवंगिका**--कोणीं ह्मणजे ! तुमच्या गुणांनीं. ते दिवशीं बाईसाहेब म्हाल्या, आणि तूं केस पुशीत होतीस, व मी लुगडें

नेसवीत होतें, त्या वेळीं त्या मल्यानें मागून येऊन तुला काय केलं ! तें मीही पाहिलें व बाईसाहेबांनींही पाहिलें. परन्तु, थोर त्या, त्यांनीं ती गोष्ट पाहिली न पाहिलीसी केली. तुह्मांला मात्र वाटलं कीं, हें कोणींही पाहिलें नसेल. मांजर दुधपितांना डोळे झांकून पीत असतें; म्हणजे त्याला वाटतें कीं आपल्या प्रमाणें कोणासही दिसत नाहीं.

**बकुलीका**—झालें तर, मी मुद्या निशीद् तुम्हाला सापडलें आहें. आता चोरून काय करूं ! बाई तूं माझ्या आई सारिखी आहेस तूंच कांहीं तरी उपाय सांग. मी तरी काय करूं ? त्याला पाहिला कीं मला कांहीं सुचत नाहीं व कांहीं भान राहत नाहीं, व त्यालाही तसंच होतें मग त्या भरांत अशी कांहीं तरी भलतीच गोष्ट चौचांत होते.

**लवंगिका**—थुः मुडे. म्हणूनच मी म्हणालें. अग हें सर्व बायकांत आहेच तुझंचस काय ! तुला तो आणि त्याला तूं जर हवीं आहां, तर सर्व काम धाम आटपल्यावर, रात्रीं, सर्व सामसुम झाल्यावर, काय पाहिजे तें करा. पण हें काय ! भरल्याच वेळेस भलतच.

**बकुलीका**—तूं सांगतेस तें खरं पण त्याची माझी दृष्टादृष्ट झाली म्हणजे, मला राहवत नाहीं. आज बाईसाहेबास विटाळ झाला त्यास तरी, तूं घेतल्यात तोच तर्क खरा.

**लवंगिका**—होयना पण ? काय झालें तें सांगतरी.

**बकुलीका**—काल रंगपंचमी झाली तेव्हां रात्रीं आम्हीं उभयतां यथेच्छ क्रीडा केल्या. तें माझ्या मनांत घोळतच होतें. आणि मी आंगणांत काहीं काम करीत उभी असतां, मीं रात्रीं केलल्या मनोराज्यांतच निमग्न होतें. इतक्यांत, मजवर तो ये-

ऊन रंग घालितो असा भास होऊन मी मागें सरलें, तोंच बाईसाहेबांस लुगड्याचा पदर लागला.

**लवंगिका**—हा खुळे पोरी, इतकी कां त्याजवर तूं भाळली आहेस ? तर तुला मी सांगतें, फार जपून वागत जा. नाहीं पेक्षां यजमानास कां हें कळलं, तर दोघांची धिंड काढून हांकून देतील.

**बकुलिका**—पण आम्ही बोलतच कां उभ्या राहिलों ? लवकर धुणी आटपून गेलं पाहिजे. ( असें ह्मणून धुवायास लागतात. )

( इतक्यांत पड्यांत नारायण असा मोठा गजर होतो )

**बकुलिका**—( दचकून ) अगबाई कायहें ( पड्यांत पाहून ) ह्यामेल्यानो. अग लवगे हे पाहिलेसकां ? मेले संन्याशी किती तरी येताहेत.

**लवंगिका**—( पाहून ) होय किंग. अग, हें कुठलं पेंव फुटलं ! मला वाटतं यांची शंभर वर्षे भरलीं, ह्मणून इथें येताहेत.

**बकुलीका**—आमच्या माहाराजांस जर कळलं, तर ह्या मेल्यांचीं डोकींच उडवितील. थोडके मेले कशाला हें ढोंग करितात काय कीं ?

( तदनंतर नारायण नामाचा उच्चार करीत सर्व शिष्यांसह श्रीशंकराचार्य प्रवेश करितात. )

**शंकराचार्य**—शिष्यवर्गांनों पाहा हीच ती माहिष्मतीनगरी कशी शोभते आहे. तसीच ही रेवानदी, जिचें उदक अमृतासही लाजवितें. हे पाहा दोन्हीं कांठानीं मोठ मोठे घांट

बांधले आहेत, व वर मंडप घातले आहेत, ज्यांखालीं हे सहस्रावधी ब्राम्हण माध्यान्ह संध्याकरीत आहेत. एकून कर्ममार्गाचें शिखरच याठिकाणीं होऊन गेले आहे. शाबास मंडना शाबास ?

**पद्मपाद**—महाराज या नदीच्या दरडी पांढऱ्या कशानें झाल्या आहेत ?

**शंकराचार्य**—ठीक प्रश्न केलास. अरे यागावांत असंख्य अग्निहोत्रे आहेत, त्यांच्या भस्मानें ह्या दरडी शुभ्र झाल्या आहेत आणि जिकडे तिकडे होमधूम्राचा सुवास सुटला आहे पाहा.

**त्रोटक**—तर मग गुरुवर्य, या नगरींत मीमांसा पूर्वकांडाचा वर्षावच होतो आहे असें ह्मटलें पाहिजे.

**शंकराचार्य**—अस्तु. आम्हाला त्या मंडनाचा वाडा सांपडला पाहिजे तस्मात् या नदीवर कोर्णी स्त्रिया धुताहेत त्यांस विचारूं. ( असें ह्मणून पुढें जाऊन ) हे स्त्रियांनो, आह्मी पांथस्थ आहोंत, या करितां तुम्हांस कांहीं विचारिलें तर नीटपणें सांगाल काय ?

**कुबकुलिका**—शिव, शिव, हे महा पातक्या तूं आम्हांस तोंड देखील दाखऊं नयेस. तुझें हें अलौकिक तारुण्य व्यर्थ करण्याचा ज्या चांडाळानें तुला उपदेश केला त्याचा सत्यनाश होवो ( असें म्हणून बोटें मोडिते. )

**शंकराचार्य**—( हंसून ) स्त्रिये, आमचें प्रालब्ध, त्याला तूं काय करितेस ! जी गोष्ट होऊन गेली त्याबद्दल बोलून मरी काय उपयोग ? तर विशेष न बोलतां मीं विचारिलें तें माहित असेल तर कृपा करून सांग.

**लवंगिका**—( पुढें होऊन ) काय बावा म्हणतोस तूं ? तुला आजच्या पुढेचीका सोय पाहिजे ? तूं हीं भिकार भगवीं वस्त्रें टाकशील तर, पुढील पण काय ? तुला पाहिजे तें या नगरींत मिळणार आहे.

**शंकराचार्य**—यायानें मला कांहीं नको. मंडनमिश्र म्हणून काशीं या गावांत पंडित आहेत त्यांच्या घराची खूण सांगा.

**बकुलिका**—अहारे वेड्या, सूर्याला हुडकण्यास कां मशाल लागते ? असो तुला खूण पाहिजे काय ? सांगतें, आणि त्यावरून मी मंडनमिश्र माहाराजांच्या घरीं दासी योग्य आहे, असें तुला कळेल. ऐकः—

जगद्ध्रुवंस्या उजगद् ध्रुवंस्यात्
कीरांगना यत्र गिरागिरंति ॥
द्वारस्थनीडांतर संनिरुद्धा
जानीहि तन्मंडन पंडितौकः ॥

अरे भिक्षुका, त्याच्या द्वारांत दोन पिंजरे लटकताहेत, त्यांत एकेक राघू आहे; त्यांतून एक राघू , जग हें सत्य आहे. असें म्हणतो; आणि दुसरा असत्य आहे, असें म्हणतो. याप्रमाणें गिर्वाणभाषेंत वाद त्याच्या द्वारीं शुक करिताहेत, तो वाडा मंडनमिश्र पंडितांचा असें समज.

**लवंगिका**—( पुढे होऊन ) अरे सौख्यविमुखा ऐकः—

स्वतःप्रमाणं परतः प्रमाणं

कीरांगनायत्रगिरागिरंति ॥
द्वारस्थ नीडांतर सन्निरुध्दाः
जानीहि तन्मंडन पंडितौकः ॥ १ ॥

अरे त्यांतील एक राघू म्हणतो कीं जग हें स्वतःसिध्द आहे, व दुसरा ह्मणतो कीं तें दुसऱ्या कडून भासते जात आहे. असा अस्खलित गीर्वाण वाणीनें वाद, ज्याच्या द्वारीं पक्षी करितात, तो वाडा मंडनमिश्र पंडितांचा असें समज.

**शंकराचार्य**—कां शिष्यांनो, ऐकिलींतना दासींची भाषणें यावरून पाहा त्या महात्म्याच्या पांडित्य किती असेल तें

**बकुलीका**—अग लवंगे, आमची धुणीतर धुऊन झालीच तर चल आतां घराकडे जाऊं. ( असें म्हणून दोघी निघून जातात. )

**पद्मपाद**—हें वाग्युध्द मात्र फार अलौकिक होणार आहे. कारण समयोचे असल म्हणजे युद्ध चमत्कार पाहाण्या सारिखा होतो.

**शंकराचार्य**—असो. आतां आपण असे गेलों तर उपयोग नाहीं. कारण त्याच्या द्वारांवर चौक्या आहेत, त्यांवर अनेक पंडित आहेत. त्यांस जिंकून मग मंडनमिश्राची भेट. तेव्हां असें करीत गेलो तर माझें आयुष्यही पुरणार नाहीं याकरितां तुम्ही सर्व या रेवातटाकीं शिवालय आहे त्यांत बसा. मी योगमार्गें जाऊन, गवाक्षांतून त्याच्या मध्यगृहांतच उतरतों; व एकदम त्याचीच भेट घेतों. चला तर. मी नंतर त्या देवालयांत येइन.

सर्व—आज्ञा. ( असें म्हणून नारायण, नारायण, म्हणत निघून जातात व आचार्यही जातात. )

---

## प्रवेश ४

( तदनंतर सोवळ्यानें हातांत पंचपात्री घेऊन मंडनमिश्र प्रवेश करितात. )

मंडनमिश्र—( आपल्याशींच ) आज श्राद्धतिथी आहे म्हणून श्रीव्यास व जैमिनी यांस निमंत्रण केलें आहे, परंतु अद्याप कां बरें येत नाहींत. माध्यान्ह तर होत आला.

( इतक्यांत गडबडीनें शिष्य येतो. )

मंडनमिश्र—कां रे कृष्णमिश्रा, कोठवर तयारी आली आहे !

कृष्णमिश्र—गुरुजी, स्वयंपाक तर सर्व सिद्ध आहे. आम्हांकडूनच उशीर.

मंडनमिश्र—पण पूजेचें साहित्य, दर्भ, पवित्रें आदिंकरून तयार करून ठेविलें आहेसना ?

कृष्णमिश्र—होय. ती सगळी सिद्धता करून ठेविली आहे. पण श्राद्धास बसणार ब्राह्मण कोण ! हें कोणांसच ठाऊक नाहीं म्हणून बोलावणेंकरितां आज्ञेची वाट पाहात उभा आहे

मंडनमिश्र—तें अगोदर कोणासही कळणार नाहीं. ब्राह्मण वेळेस आपोआप येतील बाकीची सर्व तयारी असूं दे म्हणजे झालें.

**कृष्णमिश्र**—( विचार करीत थोडें चालीस ) हो. हो. पूजे-च्या तबकांत तीळ ठेवण्याचें विसरलों. ( असें म्हणून पळून आंत जातो. )

**मंडनमिश्र**—( हंसून ) काय बेटा विसराळू पाहा.

( शिष्य पुन: गडबडीनें प्रवेश करितो. )

**मंडनमिश्र**—कारे पुन: कां आलास ? आणखीं नाहींना कांहीं विसरलास !

**कृष्णमिश्र**—आतां कांहीं नाहीं. पण माहाराज, व्यासोनारायण व जैमिनी, हे उभयतांसोबत्यानें आले आहेत.

**मंडनमिश्र**—मग कोठें आहेत ते ? त्यांस इकडे घेऊन यावें कीं नाहींरे !

**कृष्णमिश्र**—त्यांस, पादप्रक्षालनास पाणी देऊन आप-णास कळविण्यास आलों.

**मंडनमिश्र**—जातर त्यांस घेऊन ये. व पूजा साहित्यही येताना आण.

**कृष्णमिश्र**—मला वाटतें श्राध्दास आज हेच बसणार.

**मंडनमिश्र**—हो हो तेच. जा लवकर.

( नंतर शिष्य आंत जाऊन, पूजा साहित्य घेऊन व्यास व जेमिनी यांसह प्रवेश करितो. )

**कृष्णमिश्र**—माहाराज, हे गुरूवर्य बसले आहेत तर चलावें

**मंडनमिश्र**—( उठून नमस्कार करून ) यावें माहाराज हें आसन, बसावें.

( नंतर व्यास व जैमिनी आसनावर बसतात. )

**व्यास**—मंडना, आतां विलंब कां श्राध्दकर्म चालूं करावें.

मंडनमिश्र—यें आहे. पाद प्रक्षालन करून येतों ( असें म्हणून पंचपात्री घेऊन हात पाय धुण्यास उठून जाऊं लागतात तों नारायण, नारायण, असा उच्चार करित शंकराचार्य गवाक्षांतून उतरतात. त्यांस पाहून संतापून ) शिव, शिव, कोणरे हा दुष्ट, पुण्य कर्म काळीं, आपलें कृष्णमुख दाखवून मला संताप देतो ? ( मग रागानें त्यांस प्रश्न करितात. )

॥ कुतोमुंडि ॥

अरे हे मुंडन करून घेणाऱ्या कोठून आलास ?

शंकराचार्य--( " कुतः " याचा अर्थ दुसरा घेऊन उत्तर करितात. )

॥ आगलान्मुंडी ॥

अरे कमंरा, गळ्या पर्यंतच मुंडन केलें आहे.

मंडनमिश्र--( आपल्या प्रश्नाचा अर्थ दुसऱ्या रीतीनें केला म्हणुन पुनः बोलतात.

॥ पंथास्ते प्रच्छतेमया ॥

अरे मी कोठून मुंडन केलेंस असें कांहीं विचारित नाहीं. तर तुझ्या मार्गाप्रत विचारितों.

शंकराचार्य--( त्याचाही अर्थ बदलून उपरोधिक बोलतात. )

॥ किमाहपंथाः ॥

अरे माझ्या मार्गास प्रश्न केलास मग त्या मार्गानें तुला उत्तर काय दिलें ?

**मंडनमिश्र**—( या प्रश्नाचाही भलताच अर्थ केला हें जाणून त्रासून ) •

॥ त्वन्माता मुंडेत्याहतथैवाहि ॥ १ ॥

अरेमूर्खा तुझी आई मुंडा आहे असें त्यानें उत्तर, दिलें.

**शंकराचार्य**—( हांसून (

त्वं पंथानमपृच्छस्त्वां

पंथाः प्रत्याह मंडन ॥

" त्वन्माते " त्यत्र शब्दोयं

नमां ब्रूयादपृच्छकं ॥ २ ॥

अरे अनभिज्ञ, " तुझी आई मुंडा आहे " असें जें तुला उत्तर मिळालें, तें पृच्छक जो तूं त्यासच हें लागू, मजकडे त्याचा संबंध मुळींच नाहीं.

**मंडनमिश्र**—( बोलणें आंगावर आलें म्हणून अतिशय लाल होऊन )

॥ अहो पिता किमपुरा ॥

अरे असें वांकडें तिकडें ज्या अर्थी बोलतोस, त्या अर्थी मला वाटतें तूं सुरापान केलें असावेंस.

शंकराचार्य—( " पीता " याचा अर्थ " प्राशनकेली असा न घेता " पिवळी " असा घेऊन बोलतात. )

॥ नवैश्वेता यतः स्मर ॥

अरे मूर्खपणे सुरा ( पीता ) म्हणजे पिवळी नसते, तर ( श्वेता ) म्हणजे शुभ्रवर्ण असते स्मरण कर.

मंडनमिश्र—( टाळी वाजवून )

॥ किंत्वंजानासि तद्वर्णं ? ॥

अरे अधमा संन्याशी असून, सुरा कशी असते. हें जाणतोसना ?

शंकराचार्य—( गंभीरतेनें )

॥ अहंवर्णं भवान्रसं ॥

मला वर्णज्ञान आहेच. कारण, अकार ककार इत्यादिकें करून युक्त जो वेद, तो मी जाणतोंच. तूंमात्र त्या सुरेची गोडी जाणतोस.

मंडनमिश्र—( बोलणें फिरवून ) अरे निर्लज्जा, तें असो.

॥ कंथां वहसि दुर्बुत्ये गर्दभेनापि दुर्वहां ॥

॥ शिखायज्ञोपवीताभ्यां कथं भारोभविष्यति ॥३॥

अरे वेला सर्व पशूंत ओझें घेण्यास बळकट असा गर्दभ होय; पण त्यासही उचलण्यास कठीण, अशी दांडगी कथा अंगावर वाळ-

यली आहेस, आणि माझा पातक्या, शेंडी आणि जानवें तुला जड झालेंकाय ?

**शंकराचार्य**—अरे विषयलंपटा ऐकः-

॥ कथंवहामि दुर्बुद्धे तवपित्रापि दुर्वहां ॥
॥ शिखायज्ञोपवीताभ्यां श्रुतेर्भारो भविष्यति ॥४॥

अरे तुझ्या बापाला देखील उचलणार नाहीं, अशी छाटी मी अंगावर वागवितों; परंतु, शेंडी आणि जानवें मला जड झालें म्हणून काढिलें नाहीं. तर वेदांस तीं जड झाली होती.

**मंडनमिश्र**— अरे पौरुषहीना ऐकः-

त्यक्त्वापाणिगृहीतास्वामशक्त्या परिरक्षणे ॥
॥ शिष्यपुस्तकभारप्सोव्याख्याताब्रह्मनिष्ठता ॥५॥

अरे, स्त्रीचें संरक्षण करण्याचें अंगांत सामर्थ्य नाहीं म्हणून गार्हस्थधर्माचा त्याग करून, शिष्यसमुदाय आणि पुस्तकभार बाळगणारा जो तूं त्या तुझी ब्रह्मनिष्ठता समजली.

**शंकराचार्य**—अरे ऐकः-

॥ गुरुशुश्रूषणालस्या त्समावर्त्य गुरोःकुलात् ॥
॥ स्त्रियाशुश्रूषमाणस्य व्याख्याता कर्मनिष्ठता ॥६॥

अरे भगलंपटा, गुरुसेवा करण्यास नको म्हणून ब्रम्हचर्य समापन.करून, स्त्रियांकडून सेवाकरून घेणारा जो तूं त्या तुझी कर्मनिष्ठता समजली.

**मंडनमिश्र**—अरे पुरे ही तुझी बडबड तूं संन्याशी कां झालास हें मला ठाऊक आहे.

॥ क्वज्ञानं क्वचदुर्मेधाः क्वसंन्यासः क्वाकालिः ॥
॥ स्वाद्वन्नभक्षकामेन वेषोयं योगिनांधृतः ॥ ७ ॥

हे कर्मभ्रष्टा, तुझें हें ज्ञान कोणीकडे, हा संन्यास कोणीकडे आणि तुझी दुर्बुध्धी कोणीकडे, व हे कलियुग कोणीकडे कशात कांहींतरी संबंध आहे ? रोज रोज गोड खावयास मिळतें, म्हणून हा तुझा भिक्षु वेष आहे. अरे अधमा पोटाकरितां जीं तूं कर्मे सोडिलीस, त्यापेक्षां पोटांत काटे कांभरिले नाहींस ?

**शंकराचार्य**—अरे सद्गुरुबधिर, तूं कर्मठ कां झालास हेंही मी जाणतों.

॥ क्वस्वर्गः क्वदुराचारः क्वाग्निहोत्रः क्वाकालिः ॥
॥ मन्ये मैथुन कामेन वेषोयं कर्मिणांधृतः ॥ ८ ॥

अरे हें तुझें कर्म कोणीकडे, व त्या पासून मिळणारा स्वर्ग कोणीकडे, व हे अग्निहोत्र कोणीकडे, आणि हें कालियुग कोणीकडे, कशास कांहीं मेळ नाहीं. फक्त स्त्रियांशीं मैथुन करावयास मिळतें म्हणूनच तूं कर्मठ झाला आहेस.

**मंडनमिश्र**—अरे कितीं तरी नीच आहेस ? स्त्रियांची निंदा करितोस काय ?

॥ स्थितोसि योषितांगर्भे ताभिरेव विवर्धितः ॥
॥ अहो कृतघ्नता मूर्ख कथं ताएव निंदसि ॥ ९ ॥

अरे ज्यांनीं तुला जन्म दिलें, व अनेक दुःखें सहन करून वा-ढविलें, त्या स्त्रियांची निंदा ज्या पेक्षां तुझ्या मुखांतून येते त्यापेक्षा तूं कृतघ्न आहेस. तुझें मुखही पाहूं नये.

**शंकराचार्य**—अरे पापपर्वता, मी तर कृतघ्ननाहींच तथापि ही कृतघ्नता पुरवली. पण तूं कसा आहेस हें ऐक;–

॥ यासां स्तन्यं त्वयापीतं यासां जातोसि योनितः ॥
॥ तासुमूर्खतम स्त्रीषु पशुवद्रमसे कथं ? ॥ १० ॥

अरे ज्या स्त्रियांचें दुग्धपान केलेंस, व ज्या योनीपासून नि-घालास, त्याच स्त्रियांशीं, पशूवत रममाण होतोस, तेव्हां तुला लाज नाहीं वाटत ? हीं कर्मे पशूंस मात्र असतात. ह्मणून तूं मातृगामी आहेस तुझ्या पातकाला प्रायश्चित्तच नाहीं.

**मंडनमिश्र**—( तेंही समर्पक उत्तर मिळालें ह्मणून हात चोळून )

॥ दौवारिकान्वंचयित्वा कथं स्तेन वदागतः ॥

अरे अधमा, माझ्या द्वारपालांस ठकवून, तूं चोरा सारिखा कसारे आलास ? तेव्हां तुला शिक्षाच केली पाहिजे.

**शंकराचार्य**—अरे आपण चोर असून दुसऱ्यास चोर म्ह-णणाऱ्या ऐक:—

॥ भिक्षुभ्योन्नमदत्वात्वं मोक्ष्यसे स्तेनवत्कथं ॥ ११ ॥

यतीस अन्न द्यावें लागेल ह्मणून दारांत सेवक ठेवून, आंत-

त्या आंत मिष्टान्नें खाणारास, शास्त्रे चोर असें म्हणतात. तेव्हां चोर मी कीं तूं ? तूंच दंडार्ह आहस.

**मंडनमिश्र**—अरे अनाचाररता ऐक:—

॥ भ्रूणहत्यामवाप्नोसि पुत्रान्नोत्पाद्य धर्मतः ॥

अरे चांडाळा तू ब्रह्मचर्य समापन करून गृहस्थ होऊन पुत्र उत्पन्न केला नाहींस यास्तव तुला बालहत्येचें पातक लागलें आहे.

**शंकराचार्य**—( हंसून ) अरे बालहत्या पुरवली, पण सर्वांत थोर जी हत्या तिचें पातक तुला लागलें आहे. कोणचें म्हणशील तर ऐक:—

॥ आत्महत्यामवाप्तस्त्वं अविदित्वा परं पदं ॥१२॥

अरे तुला आत्महत्येचें पातक लागलें आहे. कारण, आपण कोण पुढें होणार काय, याचा तारासार विचार न करितां जननमरणांच्या फेऱ्यांत आत्म्यास घातलेंस तशांतून असें शास्त्र आहे कीं.

॥ आत्मानं सततं रक्षे द्दारै रपि धनै रपि ॥

स्त्री, पुत्र, धन, यांचाही नाश झाला तरी चिंता नाहीं, परंतु आत्म्याचें संरक्षण करावें. तस्मात् आत्मवध करणारा जो तूं, त्या तुला कोणचा तरी दंड करावा ?

**मंडनमिश्र**—( हेंही बोलणें आंगावर आलें म्हणून दांत चावून )

॥ कर्मकाले न संभाष्यस्त्वहं मूर्खेण सांप्रतं ॥

अरे मी या पुण्य कर्मांत असतांना तुझ्या सारिख्या मूर्खा बरोबर बोलूच नये.

**शंकराचार्य**—( हंसून ) त्याच्या भाषणांत " संभाष्य-स्त्वहं " या ठिकाणीं यतिविच्छेद झाला हें जाणून )

॥ अहो प्रगटितं ज्ञानं यतिभंगेन भाषिणा ॥१३॥

वाहव्वा, वाहव्वा ! यतीविच्छेद करून बोलणारे जे आपण त्या तुमच्या पांडित्याच्या ज्ञानाचा प्रकाश फारच पडला !

**मंडनमिश्र**—( तेंच साधून घेण्याकरितां )

॥ यतिभंगे प्रवृत्तस्य यतिभंगोन दोषभाक् ॥

अरे मूर्खा, यतीचा भंग ( मोड ) करण्यास जो प्रवृत्त झाला त्याच्या भाषणांत " यतिभंग " झाला, तरी दोष नाहीं.

**शंकराचार्य**—( " यतिभंगप्रवृत्त " या त्याच्या भाषणा-वर कोटी करून त्याची बोटें त्याच्याच डोळ्यांत घातल्या सा-रिखें करतात. )

॥ यतिभंगे प्रवृत्तेश्च पंचम्यंतं समस्यतां ॥ १४ ॥

अरे ठीकच म्हणतोस कारण " यतिभंग " या पदाचा पंचम्यं-तसमास कर म्हणजे, यतीपासून भंग, असा मत्यार्थ नि-घून, इतक्या वेळपर्यंत जें भाषण झालें, त्याचा निर्णय तूंच केला असें होईल.

**मंडनमिश्र**--( काय बोलावें हें न सुचतां गोंधळून )

॥ मत्तोजातःकलंजाशी विपरीतानि भाषते ॥

अरे काय करूं! हा क्षुद्र मांस सेवक उन्मत्त होऊन हवेतें बडबडतो.

**शंकराचार्य**--( " मत्त " याचा अर्थ " उन्मत्त " असा न करितां " मजपासून " असा करून बोलतात. )

॥ सत्यं ब्रवीति पितृवत्त्वत्तो जातः कलंजभुक् ॥१९॥

अरे, खरेंच आहे. जसें बीज तसा अंकुर. तुझ्यापासून जो झाला, तो आपल्या बापा प्रमाणें क्षुद्रमांस सेवन करून तुज प्रमाणें विपरीतच बोलणार आहे. यांत आश्चर्य तें काय!

**मंडनमिश्र**--( पुढें कांहीं सुचेनासें होतांच हातांतील पंजपात्री आपटून, ओरडून ) कोणीरे, या चांडाळास, या पुण्यकर्मांत सोडिलें? यज्ञमंडपांत श्वान शिरल्यानें यजमानास जो त्रास व्हावा तो मला झाला आहे. ( दांत चावून ) काय करूं! या वेळीं शस्त्र असतें तर याचा शिरच्छेद केला असता. ( मोठ्यानें ओरडून ) कोण आहेरे तिकडे, या दुष्टास नेऊन चतुर्भुज करा.

**शंकराचार्य**--( त्याजहून मोठ्यानें ओरडून कमंडलू आपटून ) अरे विषयमदांधा ब्राह्मणपशो, मोठ्या वारुळांतील महा भुजंगा प्रमाणें, स्त्री, पुत्र, कनक इत्यादि बिळांत लपून बसून सोकावला आहेस; परंतु, ( छातीस हात लावून ) हा महा मंत्री, त्यांतून तुला काढून, तुझ्या नाकांत वेसण अडकवून, वृंत

भमकरून, तुला संन्याशी करून बरोबर घेतल्या वांचून, जाणार नाहीं. खूप समज.

( व्यास व जैमिनी चकित होतात. )

**व्यास**—कां जैमिनी, हे कोण जाणिलेत काय ?

**जैमिनी**—गुरुवर्य, आपण जाणिले असतील. माझी तितकी योग्यता कोठे आहे ?

**व्यास**—अरे, भविष्योत्तर पुराणीं, शंकरावतार जो वर्णिला आहे तो हाच होय.

**जैमिनी**—एकून कैलासनाथ हे ? मग यात काय ऐकतात. परंतु, गुरुजी, या वादांतून आपण पार झालें पाहिजे.

**व्यास**—स्तब्ध हो आतां मीच युक्ती करितों. मंडनाची पण खात्रीच केली त्याणें. ( मंडनमिश्रास ) अरे मंडनमिश्रा, काय हा प्रकार मांडिला आहेस ! तुझ्या धर्मानेंच पाहा माध्यान्ह काळीं जो अतिथी येईल तो विष्णूसमान गृहस्थांस पूज्य आहे. या करितां, हा कसाही असो, त्यास दुर्भाषणे न बोलतां, त्याची पूजा करून अन्न दे. मग हवे तें बोल.

**मंडनमिश्र**— ( शुध्दीवर येऊन ) आहा हा ! खरें आहे. महाराज, अपण चांगला उपदेश केला. अगोदर, मला राग आला होता या करितां नेत्रस्पर्श करितों . ( असें म्हणून पाणी घेऊन डोळ्यास लावून शंकराचार्यांकडे वळून ) तूं म्हणजे मजहून थोर आहेस म्हणून तुला नमस्कार करीत नाहीं, तर माध्यान्हीं जो माझ्या दारीं येईल तो चांडाळ असला तरी मला पूज्य आहे. या न्यायानें आपणास मी नमस्कार करितों. ( असें म्हणून वंदन करून ) माहाराज भिक्षा घेण्यास चलावें.

**शंकराचार्य**—अरे जसी तुम्हांही भिक्षा, या भिक्ष करितो का हा सुचला नाहीं. जर द्यणें असेल तर प्रतिज्ञपूर्वक वाद भिक्षा दे.

**मंडनमिश्र**—फार उत्तम. वादाला हा भिणारा नव्हे. माझेही बाहू स्फुरण पावताहेत. तुला वादभिक्षा देतों; पण आतां ही भिक्षा घेतली पाहिजे. तशांतून आज माझी पितृतिथी आहे, तस्मात् आपणासही क्षण द्यावा अशी इच्छा आहे.

**शंकराचार्य**—बरें आहे. अरे आमचें काय ! आम्ही यती आहों; जो आम्हांस निमंत्रणे करील त्यास पावन करण्यास जाणें आहेच. पण माझें माध्यान्हस्नानहोणें आहे. तें करून येतों.

( असें म्हणून नारायण नारायण करीत निघून जातात. )

**व्यास**—मंडन मिश्रा, आतां विलंब नको; श्राद्धकर्म संपलें पाहिजे. आणि ते यतीही आतां येतील तर इतर सर्व तयारी आहेना ?

**मंडनमिश्र**—सर्व तयारी आहे. ते येतांच आरंभच करावयाचा.

**व्यास**—पण ब्राम्हणांनीं बसवयाचें कोठें ? येथेंच कां ?

**मंडनमिश्र**—नाहीं महाराज. मागल्या सोप्यांत तयारी आहे

**व्यास**—बरें तर चला तिकडेच जाऊं. ( असें म्हणून सर्व निघून जातात.

---

# प्रवेश ९.

## [ स्थळ— रेवा तटाकांचें शिवालय ]

( तदनंतर पद्मपाद, त्रोटकाचार्य आदिकरून आ-
चार्य शिष्य प्रवेश करितात. )

**पद्मपाद**—अहो त्रोटकाचार्य, गुरूजी, " मंडनमिश्रास भे-दून येतों तुम्हीं या देवालयांत बसा, " असें सांगून गेले, ते आद्याप आले नाहींत. काय कारण असेल तें असो. मला तर फारच काळजी लागली आहे.

**त्रोटक**—काळजी काय म्हणून करिता ! कांहीं कारणानें विलंब झाला असेल. त्यांस आपाय करणार या त्रिजगांत कोण आहे !

( इतक्यांत पडद्यांत नारायण असा शब्द होतो. )

**पद्मपाद**—आली बरें स्वारी.

( नंतर शंकराचार्य प्रवेश करितात. )

**शंकराचार्य**—(नारायण असें म्हणून आसनावर बसतात ) शिष्यवर्गांनो, मला येण्यास थोडासा उशीर लागल्यामुळें तुम्हाला फार काळजी लागली असेल नव्हे काय ?

**पद्मपाद**—सत्य आहे. आपला वियोग एक क्षणही सहन होतनाहीं, मग इतक्या वेळ तो सहन करण्याचा प्रसंग आल्यावर अवघड वाटल्या वांचून कसें राहील !

**शंकराचार्य**—असो आतां तिकडील वर्तमान सांगतो ऐका:—मीं त्याच्या, गवाक्षांतून मध्यगृहांत उतरलों, त्या काळीं

तो श्राद्ध कर्मांत गुंतलेला होता. मग मला पाहून अतिशय संता-पून दुर्भावणें बोलूं लागला. त्या प्रमाणें मीही उलट त्यास बो-ललों. शवटीं त्याजपासून, " वाद करितों " असें वचन घेऊन, त्याचें घरीं भिक्षा घेऊन आलों. ता आतां येथें येईल. व त्याच्या आणि आमच्या वादास आरंभ होईल.

**त्रोटक**—महाराज; आपला आणि त्याचा तो अलौकिक वाद आह्मीं केव्हां ऐकूं, असें आम्हांस झालें आहे.

( इतक्यांत कांहीं पंडितां समवेत मंडनमिश्र येतात. )

**मंडनमिश्र**—( शंकराचार्यां पुढे आसन घालून बसून ) मी येत, तुझी वादाची उमेद जिरविण्या करितां आलो आहे, तर वादास आरंभ कर.

**शंकराचार्य**—( हंसून ) ठीक केलेंस. आतां कोणाची उमे-द जिरेल हें वादांतीं कळेलच. परंतु, मी असा वाद करणार नाहीं कारण तसा पोकळ वाद करण्याची मला गरज नाहीं; तर परस्प-रांनीं आपापले सिद्धांत सांगून, प्रतिज्ञा करून, वाद करावेत.

**मंडनमिश्र**—अरे प्रतिज्ञेची काय गरज आहे ! तुझा आणि माझा वाद व्हावा, मग काय निर्णय ठरणें तो ठरतोच आहे.

**शंकराचार्य**—छें, छे, तसें कदापि होणारच नाहीं प्रतिज्ञे शिवाय मी अक्षरही बोलणार नाहीं.

**मंडनमिश्र**—बरें आहे, तसेंच कां होईना. हा, मी माझा सिद्धांत बोलून प्रतिज्ञा करितों. ती ऐक:—" उपनिषद्वाग आत्मस्वरूप सांगण्याकरितां नाहींत. तर क्रियापर आहेत. कारण शब्दामध्यें कांहीं तरी क्रीया दाखविली असते, ती क्रिया आत्मस्वरूप सांगण्यांत सिद्ध होतनाहीं. कर्मापासून मुक्ती आहे. या करितां यावज्जीव कर्मच केलें पाहिजे. " हा माझा सिद्धांत

आहे. हा जर तूं खंडन केलास तर मी शुभ्र वस्त्रें टाकून, काषाय वस्त्रें परिधान करून संन्यास घेऊन, तुझा शिष्य होईन. असें जर न करीन तर माझ्या बेचाळीस पूर्वजांसह मी नरकास जाईन. ही माझी प्रतिज्ञा. तुम्ही आतां काय ती रड.

**शंकराचार्य**—शाबास आतां कांहीं हरकत नाहीं. आतां माझीही प्रतिज्ञा ऐक:— " सच्चिदानंद ब्रह्म एकच आहे; अनादि अविद्या योगेंकरून, भ्रमानें जशी शुक्ती रूप्याकारें, तद्वत जगदाकारानें दिसतें त्या ब्रह्मज्ञानें करून सकल प्रपंच्याचा लय होतो. या विषयीं उपनिषदें प्रमाण आहेत. जीव आणि ईश्वर यांस भेद नाहीं. कर्मेंकरून मुक्ती कदापि मिळणार नाहीं विचारें, आत्मज्ञानें करून मुक्ती. " हा माझा सिद्धांत. हा जर तूं खंडन केलास, तर ही काषाय वस्त्रें टाकून, श्वेत वस्त्रें परिधान करून, लग्न करून घेऊन, तुझा शिष्य होऊन राहीन. आणि मग जर हें न करीन, तर मी ही बेचाळीस पूर्वजांसह नरकास जाईन.

**मंडनमिश्र**—झाल्या तर आतां उभयतांच्या प्रतिज्ञा; या सर्व सभासदांनीं ऐकिल्या. आतां वादास आरंभ होऊंदे.

**शंकराचार्य**—नाहीं अद्यापी एक गोष्ट होणें राहिलीच आहे ती कोणचीं ह्मणशील, तर ऐक:— तुझा आणि माझा वाद हा. मोठ्या महत्वाचा होणार आहे. व उभयतांच्या प्रतिज्ञा ही झाल्या आहेत. तर यांत हरला कोण, व जिंतला कोण, हें सांगण्यास, कोणी योग्य तिऱ्हाइत पाहिजे. व तो येऊन या सभेंत बसला पाहिजे. त्या शिवाय वादाला आरंभ होऊन फळ नाहीं.

**मंडनमिश्र**—आतां तिराइत कोण आणावा? तूंच सांग—

**शंकराचार्य**—तिराइत तुझ्याच घरीं आहे. कांहीं हुडक-

ण्यास जाण्यास नको. तुह्मी पत्नी, साक्षात सरस्वतीचा अव-तार आहे. हें मी जाणता. तर, आमच्या वादांत, तीच मध्यस्थ पाहिजे. तेव्हां तिला येथें आणीव.

मंडनमिश्र—फार उत्तम. ( शिष्याकडे वळून ) अरे कृष्ण-मिश्रा, घरीं जाऊन, तिला माझी आज्ञा सांगून, या ठिकाणीं घेऊन यावें.

कृष्णमिश्र—गुर्वाज्ञा प्रमाण. ( असें म्हणून पडद्यांत जा ऊन सरस्वती सह प्रवेशकरून, तिला म्हणतो. ) महाराज, हे य-जमान यती समोर बसले आहेत. चलावें.

सरस्वती—( यतीस व पतीस नमस्कार करून. ) माहाराज या मोठ्या सभेंत मला अबलेला किमर्थ आणविली ?

मंडनमिश्र—याचें उत्तर, तुला तो यती देईल. त्यास प्रश्न कर.

शंकराचार्य— सरस्वती इकडे पाहा. तुला या स्थळीं कि-मर्थ आणविली, याचें उत्तर सांगतों. ऐक:—तुझ्या पतीचा व माझा मतवाद होणार. त्यांत, त्याणें मला जिंकिल्यास, मी त्याचा शिष्य व्हावें; व मी त्यास जिंकिल्यास त्याणें माझा शिष्य व्हावें. असें प्रतिज्ञा पूर्वक ठरलें आहे. परंतु, जय अपजय सांगण्यास कोणी निःपक्षपाती तिराइत पाहिजे. तेव्हां त्या कामा-वर, आह्मीं उभयतांनीं तुह्मी योजना केली आहे. तर तूं त्या, स्थानावर बसून, आम्हा उभयतांत हरला कोण व जितला कोण-याचा निर्णय करावा.

सरस्वती—महाराज, मी स्त्री होय. तुमच्या या अगाध वादांत मला काय समजणार आहे? तेव्हां हें स्थान मला उप-योगी नाहीं.

**शंकराचार्य**—सरस्वती मला तूं शिकवितेस काय गुरुं योग्यता मी जाणतो. तूं सर्व विद्येची माता आहेस. तेव्हां तुला ठाउक नाहीं असा वाद, आह्मी कोणता करणार आहोत? तस्मात् तुझें हें बोलणें अगदीं उपयोगाचें नाहीं.

**सरस्वती**—आपण म्हणतां हें कदाचित् खरं असेल. परंतु दुसऱ्या अडचणी आहेत. माझे पती वाद करणार, आणि मी मध्यस्थ ही योजना चांगली नाहीं. कारण त्यास जय आला म्हणून सांगितल्यास पक्षपाताचा आरोप येईल. व आपणास जय आला असं सांगितल्यास, पतिद्रोह केला असं होइल. तस्मात् मला, या लचांडांत आपण घालूनये.

**शंकराचार्य**—तुजहून आमचा वाद समजण्यास अन्य कोणी समर्थ नाहीं. आणि मध्यस्थानें अगदीं निःपक्षपातानें वर्तन केल्यास, त्याला कोणाचेंही भय नाहीं.

**सरस्वती**—आपणाशी एक सांगणं राहिलंच तें हें:—घरांत अग्निहोत्र आहे. प्रपंचांत अनेक अडचणी आहेत. तशांतून, पती इतके वादाला गुंतले, तेव्हां मला तिकडे राहिलच पाहिजे. म्हणून मी एक युक्ती काढिते, ती ही:—मी उभयतांच्या गळ्यांत एक एक पुष्पमाला घालिते, मग वादास अरंभ करावा. नंतर ज्याची माळ कोमेजेल तो हरला; व ज्याची टवटवीत राहिल, तो जिंकला. असं झाल्यावर मग मध्यस्थाची कांहीं गरज नाहींना !

**शंकराचार्य**—शाबास, उत्तम युक्ती काढिलीस. एकून तुं चतुर खरी घाल तर त्यामाळा आणि तूं जा.

**सरस्वती**—बरं आहे ( असें म्हणून उभयतांच्या गळ्यांत पुष्पमाला घालून निघून जाते. )

**मंडनमिश्र**—कां यते, झालीना सर्व तयारी? आतां वादास आरंभ होउंद्यत.

शंकराचार्य—आतां कांहीं चिंता नाहीं. माझा सिद्धांत तूं ऐकलाच आहेस, तर आतां प्रथमतः पूर्वपक्ष कर.

मंडनमिश्र—भो यते, जीवेश्वराचें ऐक्य तूं प्रतिपादितोस पण त्याज प्रमाणें कांहींच दिसत नाहींत.

शंकराचार्य—श्वेतकेतुप्रमुखशिष्यांतें उद्दालक प्रभृति महर्षींनीं, जीवेश्वराचें ऐक्य सांगितलेलें, वेदांत वर्णन केलें आहे. तेच प्रमाण.

मंडनमिश्र—वेदनिष्ट तत्वमस्यादि वाक्यें, "हुंफट" या सारिखीं, केवळ जपार्थ आहेत. त्यांत दुसरा अर्थ कांहींच नाहीं.

शंकराचार्य— "हुंफट" इत्यादि वाक्यांत, अर्थमुळीच नाहीं. म्हणून ज्ञात्यांनीं जपार्थ उपयोग केला. "तत्वमसि" या वाक्यांत स्पष्ट अर्थ भासत असतां, जपार्थ कशीं ह्मणतां येतील

मंडनमिश्र—जीवेश्वराचा अभेदपर अर्थ जरी या वाक्यांत दिसतो, तरी ती यज्ञ कर्त्यांची स्तुती म्हटली पाहिजे, कारण ऐक्यार्थ, जीवेश्वराचा आपण ह्मणतां तो, बुद्धींत कोणाच्याही आरूढ होत नाहीं. तेव्हां यजमानप्रशंसापर अर्थ करणें योग्य आहे. या वरून, सर्व उपनिषदें कर्माची पूर्ती दाखविणारीं आहेत; हेंच सिद्ध होतें.

शंकराचार्य—"आदित्यो यूपः" इत्यादि कर्मकांडांतलि वाक्यांचा अर्थ कर्मप्रशंसापर करणें योग्य आहे. तसा ज्ञान कांडांतील "तत्वमसि" इत्यादि वाक्यांचा अर्थ करण्यास कांहींच आधार नाहीं.

मंडनमिश्र—तर "मनाची उपासना ब्रम्हरूपानें कर" असी सांगण्या करितां "अन्नं ब्रह्म" इत्यादि जीं वाक्यें, त्या प्रमाणें उपासनापर अर्थ असो ऐक्यार्थ करणें योग्य नाहीं.

**शंकराचार्य**—मनाची ब्रह्मरूपानें उपासना करावी, इत्यादि विधि सांगितल्याप्रमाणें "तत्वमसि या वाक्यांत, विधि सांगितला नाहीं. तेव्हां उपासनापर अर्थ कसा होईल?

**मंडनमिश्र**—तत्वमस्यादि वाक्यांत, विध्यर्थ स्पष्ट न दिसला तरी, विधि कल्पना केला पाहिजे. कारण, "रज्जु आहे सर्प नव्हे" असें सांगताच सर्पभ्रांती जाऊन, तात्काल भय जातें. तसें "तत्वमसि" हें वाक्य ऐकतांच होत नाहीं. व सुखदुःखादि क होतात तसेंच श्रवणानंतर मनन, ध्यान, सांगितलें आहे त्यापेक्षां तात्काल फल नाहीं, म्हणून उपासनेचपरी विध्यर्थच घेतला पाहिजे.

**शंकराचार्य**—उपासनापर अर्थ केल्यास, स्वर्ग किंवा ध्यान याप्रमाणें मानासिक कृत्रिमत्व मोक्षाला प्राप्त होईल.

**मंडनमिश्र**—उपासनापर अर्थ नको; तर जीवाला ब्रम्हाची उपमा देतात, असा अर्थ करावा.

**शंकराचार्य**—चैतनत्वा विषयीं उपमा म्हणशील तर सर्वांस प्रसिद्ध जो अर्थ त्याच्या उपदेशाचें कारण नाहीं; बरें. जर सर्वज्ञ त्याची गुणांची उपमा म्हणशील तर जीव सर्वज्ञ म्हटल्यानें तुझ्याच मताला विरोध येतो.

**मंडनमिश्र**—सर्वज्ञत्वादि गुण मायायोगानें आच्छादित आहेत; तेव्हां उपमा घेण्यांत बाध कोणता?

**शंकराचार्य**—असें आहे तरः—भिन्नत्व शंका मायिक असें तूंच कबूल करितोस, आणि "तत्वमसि" या वाक्याचा अर्थ एकत्व बोधनपर नव्हे, असा दुराग्रह, तूं विद्वान असून कां करितोस?

**मंडनमिश्र**—असें एकत्व जरी मासतें, तरी मीच ईश्वर

असा प्रत्यय येतनाहीं. तेव्हां, " तत्वमस्यदि " वाक्यांला, जपो-पयोगित्वच योग्य दिसतें.

**शंकराचार्य**--इंद्रियें करून जर भेदज्ञान सिद्ध होईल, तर अभेद श्रुतिवाक्याला बाध येईल. तसें घडत नाहीं. कारण वाक्यज्ञानास इंद्रियवेद्यत्वच नाहीं.

**मंडनमिश्र**—इंद्रियवेद्यत्व नाहीं कसें ? ईश्वराहून मी निराळा असा जीवाला भास होत नाहीं काय !

**शंकराचार्य**—अनात्म्याचा भास होवो. परंतु आत्मा इंद्रियवेद्य होणें नाहीं.

**मंडनमिश्र**--आत्मा आणि चित्त, या उभयतांसही, द्रव्यत्व स्वीकारिलें आहे; तेव्हां इंद्रियवेद्य नाहीं असें म्हणणें अनुचित आहे.

**शंकराचार्य**—आत्माव्यपक, किंवा सूक्ष्म ! उभय प्रकारांनींहा इंद्रिय वेद्यत्व घडत नाहीं. सावयवी पदार्थांचेंच वेद्यत्व घडेल.

**मंडनमिश्र**—आत्मा वेद्य नव्हे, तर श्रुतींनीं, जीवात्मपरमात्म्याचें एकत्वबोधन कसें केलें ?

**शंकराचार्य**--श्रुतींनीं, " अविद्योपाधि जीव. " आणि, मायोपाधि ईश्वर. " असा भेद सांगून, नंतर दोनी उपाधींचा त्याग सांगितला. तेणेंकरून अर्थात एकत्व सिद्ध झालें; म्हणून आत्मा वेद्य होत नाहीं.

**मंडनमिश्र**—जीवेश्वर मिथ्या म्हणतां तर " यद्वा सुवर्णा " इत्यादि अनेक जागीं. श्रुतींनीं उभयतांचे स्वरूप कथासाठीं प्रतिपादन केलें ! आणि आत्म्या वांचून इतर पदार्थ अचेतन

म्हणतां, तर जीवेश्वराचे ठायीं प्रत्यक्ष चेतनत्व क्रिया दिसते कशी ? याचें उत्तर समर्पक मला सांगा.

**शंकराचार्य**—श्रुतींनीं, जगाचे ठायीं अज्ञानें करून जो भेद आहे त्याचें वर्णन मात्र करून, तो भेद खोटा, मायिक असें दाखवून, एकत्व शेवटीं प्रतिपादन केलें. त्या वरून भेद दाखविणाऱ्या सर्व श्रुती बाधित झाल्या, आतां जीवेश्वराचे ठायीं चेतनारूप कर्तृत्वधर्म दिसणारा खोटा आहे व तो स्वताचा नव्हे जसें, तापलेलें लोखंड जाळतें, तो दाहकधर्म अग्नीचा आहे. लोखंडाचा नव्हे, असें असून, लोखंड जाळितें अशी मिथ्या समजूत होते. तसेंच, पांच ज्ञानेंद्रियांचे ठायीं, व मन आदि अंतःकरणाचे ठायीं, जो ज्ञानव्यापार दिसतो, तो सर्व आत्मनिष्ठ असून त्या त्या इंद्रियांस ज्ञान आहे असा मिथ्या भास होतो. जीव आणि ईश्वर हें छाया व ऊन, यां प्रमाणें आहेत, परंतु दोनीसही कारण सूर्य, तो निराळाच आहे. तद्वत आत्मा, सर्वांहून भिन्न असून, सर्वांस कारणभूत तोच आहे. असा खरा प्रकार असून, तो ठाऊक नसणें याचें नांव अज्ञान, त्याणें बंध, शोक, घडतात. आणि आहे तसें समजणें, याचें नांव ज्ञान, त्याणें सर्व शोक, बंध, नाहींसे होऊन मोक्ष पावतो; म्हणजे जन्ममरण रहित असा होतो. या ज्ञानाचा मुख्य अधिकारी, श्रुतींनीं सांगितल्या प्रमाणें, शांत दांत, इत्यादि गुणांनीं पुर्ण असला पाहिजे. तशा अधिकाऱ्यास, विचारानें ज्ञान प्राप्त होतें; तेव्हां कर्म, उपासना, इत्यादि सर्व, चित्त निर्मळ होण्याची साधनें आहेत. त्या पासून मोक्ष होणें नाहीं. करितां हे मंडनमिश्रा, आपल्या कर्मांचा दुराग्रह सोडून विचार कर, म्हणजे, संसार हा मिथ्या भास आहे. केवळ अधिष्ठान सत्यत्वानें खरासा दिसतो. जसें, जळाचे ठायीं तरंग, किंवा सुव-

जांच ठायीं दागिन्याचा भास, त्यांत खरें म्हटलें तर पाणी व सोनें; त्या प्रमाणें या जगाचे ठायीं, आकार खोटा व खरें सच्चिदानंद ब्रम्ह आहे, असें प्रत्यक्ष तुला भासूं लागेल, आणि तात्काल मुक्त होशील.

**मंडनमिश्र**—पण मला वाटतें, आतां सायंसंधेची वेळ झा: ली; तर झाला इतका आज वाद पुरे, उद्यीक नित्यकर्म आटपून मी येथें येईन नंतर वाद आणखी हा करूं.

**शंकराचार्य**—ठीक आहे. तूं जावेस, आतां आम्हीही रेवा नदीवर गमन करितों ( असें म्हणून सर्व निघून जातात. )



## प्रवेश ६

( तदनंतर शिलादपंडित व कौस्तुभपंडित प्रवेश करितात. )

**कौस्तुभपंडित**—कां शिलादपंडित, आज आठ दिवस झाले, तुमची काहे गांठ नाहीं ! एक दोन वेळां मी घरीं आलों परंतु भेट झाली नाहीं. अशा कोणच्या राजकारणात गुंतला आहां ?

**शिलादपंडित**—खरोखर आतांशा मी मोठ्या राजकारणांत गुंतलों आहे. सध्या, मंडनमिश्र पंडिताचा व शंकराचार्य नामक यतीचा वाद चालला आहे; तो मौज पाहाण्यास मी सकाळ संध्याकाळ त्या शिवालयांत जात असतों.

**कौस्तुभपंडित**—मी ही तें वर्तमान, सरस्वतीनें त्या उभ-यतांच्या कंठांत पुष्पमाला घातल्या, येथपर्यंत ऐकिलें, पण पुढें काय झालें हें कळलें नाहीं म्हणूनच मी तुम्हाकडे आलों आहे.

**शिलादपंडित**—त्यानंतर, पुढें मग दुसरे दिवसा पासून त्या उभयतांचा वाद सुरू झाला. काय सांगूं विलक्षण त्या उभयतांच्या वाग्विलास ! मोठे मोठे पंडित बसले असतात. पण कित्येक ठिकाणीं, त्यांसही, ते काय म्हणतात हें कळत नाहीं. दोघेही अस्खलित वक्ते मंडनमिश्र महाराजांचें भाषण, मीं पूर्वी पुष्कळ वेळां ऐकिलें होतें. परंतु, या वादांतील भाषणाच्या शतांशही तें नसेल. तो वक्ता तर काय विलक्षणच. एकदा पूर्व-पक्ष मंडनमिश्राच्या मुखांतून निघाला कीं, विचार न करितां लागलेंच समाधान करून, वर आजवर त्याचें कांहीं तरी नवें आहेच. या प्रमाणें तो वाद चालला असतां, इतर सभासदांस कांहीं देहभान नसतें. सर्व सभा चित्रां प्रमाणें असते.

**कौस्तुभपंडित**—बरें पण, हा वाद किती दिवस चालला आहे, व वादरीती कशी काय आहे, हें तरी सांगा पाहूं !

**शिलादपंडित**—वादास आरंभ, सकाळीं दोन घटका दिवसास नित्य होतो. त्यापूर्वी त्या उभयतांचें स्नानसंध्यादि अनुष्ठान संपलेलें असतें, मग बारा घटका दिवस येईपर्यंत सकाळीं वाद चालतो, व त्यावेळेस सरस्वतीबाई, सोवळ्यानें देवालयांत बसून, यतीस भोजनास, व यतीस भिक्षा घोलावून नेतात. नंतर वाद बंद करून भोजन करण्यास ते जातात; मग पुनः संध्याकाळचा दहा घटका दिवस उरला कीं, वादास आरंभ होतो तो सूर्यास्ता पर्यंत. याप्रमाणें आज सहा दिवस झाले.

**कौस्तुभपंडित**—पण कांहो, वादांत कोण हरेलसें दिसतें !

पहा, त्या यतीस जर पराजय आला तर काय मौज होईलहो? मी तर दहासहस्र ब्राम्हणभोजन घालीन.

शिलापांडित—छे, छे, असें स्वप्नांत देखील आणू नका. तो यती बृहस्पतीसही जींकील, मग याची कथा काय! तुम्ही त्याचें भाषण ऐकिलें नाहीं, म्हणन असें म्हणतां. माझी तर आजपर्यंत, कर्ममार्गावर फारच अभिरुची होती. संन्याशाचा मी अति तिरस्कार करीत होतों; पण त्या महा संन्याशाचें भाषण ऐकूं लागल्या पासून, वास्तविक मलाही आमचें हें मत गैरसें वाटूं लागलें. फार काय सांगूं! त्याच्या मुखांतून तीं मुक्ताफळें पडूं लागलीं कीं, वैराग्यच उत्पन्न होतें. सर्वसंग परित्याग करून, त्याचा शिष्य होऊन, त्याजबरोबर जावेंसें वाटतें.

कौस्तुभपांडित—तरमग तुमच्या म्हणण्या वरून, मंडनमिश्रांतच पराजय येईल असें साफ झालें.

शिलापपंडित—तसेंच नेंच. मी फार बारकाईनें पाहत असतां; आज दोन दिवस मंडनाच्या गळ्यांतील फुलांची माळ किंचित म्लान दिसते. काल सायंकाळीं तर विशेषच ती कोमेजलेली दिसूं लागली. मी खचित सांगतों, बहुतकरून वाद आजच संपेल, कारण मंडनाच्या गळ्यांतील माळेचें आयुष्य आजच्यावर जास्ती निभावेलसें दिसत नाहीं.

कौस्तुभपंडित—तरमग आज तरी मी येतोंच कारण अशी मौज पाहण्याची संधि, माझ्या दुर्देवानें गेलीहो!

शीलापंडित—चला चला तर लौकर. आतां अगदीं उशीर नाहीं. तो पहा, सर्व पंडितांची पळापळ सुरू झाली आणि हा वाद प्रारंभ होण्याचा क्षणांही होऊं लागला. तो पहा, प्रभातकाळीं

आनसंध्यादि विधि आटपून याल सूर्याप्रमाणें प्रकाशतो आहे व ज्याच्या माग पुढें हजारो पंडितांची दाटी आहे, व ज्याच्या गळ्यांतील फुलांची माळ, त्रिदोष झालेल्या रोग्याच्या नाडीप्रमाणें, किंचित चमकत आहे, असा मंडनमिश्र पंडित शिवालयाकडे चालला. तर आतां राहून फळ नाहीं. आपणही जाऊं. (असें म्हणून गडबडीनें दोघेही निघून जातात.)

---

## प्रवेश ७.

### ( स्थळ—शिवालय

( तदनंतर शिष्यासह शंकराचार्य येऊन बसतात, नंतर अनेक पंडितांसह मंडनमिश्र येऊन आपल्या जाग्यावर बसतात. )

**शंकराचार्य**—मंडनमिश्रा तुझा आणि माझा वाद सहा दिवस चालला आहे; आज सातवा दिवस. तूं ज्या ज्या शंका घेतल्यास त्या त्या मी निवारण केल्या तथापी तुं आपले हट्टमत सोडीत नाहींसकाय? बरें बोल, आणखी काय पूर्वपक्ष असतील ते.

**मंडनमिश्र**—भो यते, तुं जीवेश्वरास अभेद आहे, असें सिद्ध करितोस. तर कितीएक जीव सुखी आहेत; व कितीएक दुःखी आहेत असें कां?

**शंकराचार्य**—फार उत्तम प्रश्न केलास. त्यांतील बीज तुला सांगतो ऐक:—अनिर्वाच्य, निरुपम, अशा आत्म्यास तुलना तर देतांच येतनाहीं. परंतु आत्मस्वरूप आकाशवत् व्याप्त आहे. तथापी घटाकाश, जलाकाश, आणि मठाकाश, हीं तत्वदृष्ट्या निराळीं

आहेतशीं भासतात. घट बुद्धीनें ते आकाश स्वतंत्रसें वाटतें. तसेंच इतर. परंतु तो घट नष्ट झाला म्हणजे, तेआकाश कोठें गेलें ! आ-णखी, घट असतांना तरी घटाकाश निराळें असें; घटव्यवधानें भा सत होतें. परंतु,त्या आकाशांत, घटाकाश किंवा जलाकाश हो-ण्यास, कांहीं तरी विकार होतो काय ? कांहींच नाहीं. तद्वत पर-मेश्वराच्या स्वरूपाचा क्रम आहे. आतां " कांहा जीव सुखी व कांहीं दुःखी कां? " असा तुझा प्रश्न आहे; तर ऐक–हे सुखदुः-खादिभेद; त्या निरंजन आत्म्याच्या ठायीं मुळींच नाहींत. माया तिरोहित जीवांची ही भ्रांती आहे. पहा स्फटिकमणी हा जात्या शुभ्र असतो. तोच मणी; रक्तपटावर ठेविला तर रक्तवर्ण भास-तो नीलवर्णावर ठेविला तर सर्व नीलमय भासतो. परंतु, त्या मूल मण्याच्या वर्णांत कांहीं तरी विकार होतो काय? नाहींच. त्या प्रमाणें सुख किंवा दुःख हेच कोणी एक वर्ण त्यास्फटिक मण्याप्रमाणें स्वच्छ आत्म्यावर तिरोहित झाले म्हणजे तद्वर्ण मूढ जनांस तो भासूं लागतो. वस्तुतः त्यास हा विकार मुळींच नाहीं. हे बुद्धि धर्म आहेत.

मंडनमिश्र—बरें पण जीवास मुक्ती म्हणून जी तु सांगतोस ती कशी प्राप्त व्हावी? तल्लक्षण काय?

शंकराचार्य—हे सर्व जीव वासनासूत्रांत ग्रथित होतसाते, जन्ममरणादि उपाधि अनुभवितात. तस्मात ती वासना समूळ नष्ट झाली म्हणजे मुक्तीच मिळते.

मंडनमिश्र—शंकराचार्या ह्या वादांत मात्र तुला जिंकलो. अरे वासना नष्ट झाली म्हणजे मुक्ती मिळते म्हणतोस मग निद्रा कालीं, वासना नष्ट होते, परंतु जीवास मुक्ती कां मिळत नाहीं? पुनरपि त्यास संसार आहेच.

शंकराचार्य—शाबास मंडना शाबास फार खुबीदार प्रश्न के-

ल्यास ऐक तर—वासना समूळ नष्ट झाली पाहिजे, असें मी म्ह टलें आहे, तें तरी ध्यानांत आहेना? वासना नष्ट झाल्या वांचून सिद्धा तर येणें नाहींच; हा तर सिद्धांत होय. परंतु त्या काळीं ती समूळ नाश पावत नाहीं तर, सरकांत जसें वस्त्र गुप्तरुपें असतें- तद्वत हें सर्व जग त्या वासनेंत निद्राकाळीं लीन होतें. नंतर ती वासना आज्ञानांत गढून गेलेल्या जीवा सन्निध, सुरकी प्र- माणें बीज रूप होऊन लीन झालेली असते. आतां सरकींत वस्त्र कसें जर म्हणशील तर ऐक:—सरकी पेरली ह्मणजे तीस अंकूर येऊन, वृक्ष होऊन, पुष्पें येऊन, फळें होऊन, त्या पासून कापूस निघतो. नंतर त्याचीं वस्त्रें होतात, परंतु त्या- स अधिष्टान सरकी होयकीं नाहीं? तद्वतच हें सर्व जग त्या वासनेंत असत. या करितां, त्या जीवास जागृदवस्था प्राप्त झाली कीं त्या वासनेस अंकूर फुटून हें विश्व भा- सुं लागते. आतां तीच जर सरकी भाजून ठेविली तर तिला अंकूर मुळिंच येणार नाहींत. तद्वत ती वासना ज्ञा- नाग्नीनें भर्जित केली ह्मणजे हे संसाररूपी अंकुर तिला फुट- णार नाहित, व हा मिथ्या भास नाहींसा होईल, तीच मुक्ती.

**मंडनमिश्र**—भो यतिवर्य त्या मुक्तीचे ठायीं अनुभव कोणचा.

**शंकराचार्य**—अरे हे मंडना मुक्तीचे ठायीं अखंडानंदानु- भव, हाच काय तो होय.

**मंडनमिश्र**—तो आनंद विषयानंदाहून भिन्न आहे किं- वा कसें?

शंकराचार्य—नाहीं, नाहीं; हा आनंद तेथून सर्व एकच आहेत. आत्मस्वरूपानुभवा वांचून, आनंद होणेंच नाहीं.

मंडनमिश्र—मग विषयादि सेवनापासून आनंद होतात तें खोटें कीं काय?

शंकराचार्य—अरे तेही ब्रह्मानुभवानंदच होत. आत्मानुभवा वाचून आनंद होणेंच नाहीं; असें जें मि म्हटलें, तें सिद्ध करून दाखवितो पहा:—जगन्मूलक जी वासना तिचे काय धर्म आहेत म्हणशील, तर एकः—वासनेनें जीवापासून निघावें व एखाद्या विषयावर धांवावें. तो विषय मिळालाकीं, पुनः मागे फिरावे पुनः दुसऱ्या विषयाकडे जावें, असे तिचे असंख्य फेरे चालतात, त्यास वृत्ती असें म्हणतात. आतां उदाहरणार्थ एक अन्न विषय घे. वासना जीवापासून निघाली आणि अन्नावर चालली, तेथें तिला अन्न मिळालें त्या वेळीं ती मागें फिरली' त्या काळीं ती परत येतांना, त्या वासनेची आणि आत्मस्वरूपाची सन्मुखता होते, आणि ब्रम्हप्रतिबिंब त्या वासनेंत हीते, त्या बरोबर जिवास आनंद होतो. परंतु हा मूढ तोही विषयानंदच समजून तो आनंद विसरतो, आणि पुन्ह वासना आत्मव्यापारास लागते. या प्रमाणें विषयानंदाजे व आत्मानंदाचे भेद आहेत. परंतु, योगी तोही ब्रम्हानंदच जाणतो. “ ब्रम्हानंदाशिवाय आनंद नाहीं ” हें माझें म्हणणें खोटें कीं काय?

( इतक्यांत मंडनमिश्रास समाधी लागते या मुळें तो निरुत्तर होतो. व कंठातील माळा सुकून जाते. त्या काळीं सर्व लोक “ जितं जितं धन्योसि धन्योसि ” या प्रमाणें म्हणून टाळ्या वाजवितात. आणि आचार्यांवर पुष्पवृष्टी होते. )

शंकराचार्य—( आनंदानें ) शिष्यवर्गानो, पाहा हा निरु-

थर झाला. व त्याला, आनंदाचें विवरण करितांच समाधि लागली.

**पद्मपाद**—महाराज तो हलत यांत संशय नाहीं. त्याच्या कंठांतील माळा पहा, कशी करपून गेली आहे ती.

**शंकराचार्य**—त्याला समाधी अशी राहूं देतां नये. त्यास जागृत केलें पाहिजे. ( असें ह्मणून त्यास हलवून जागत करितांत. ) कां मंडनमिश्रा असा स्तब्ध कां बसलास. पूर्वपक्ष कर. या तुझ्या मौनास हे तुझे अनुयायी पंडित हंसताहेत.

( नंतर, मंडनमिश्र व सर्व पंडित आचार्यांपुढें साष्टांग प्रणिपात घालतात. )

**शंकराचार्य**—( मंडनास उठवून पोटाशीं धरून ) बा मंडनमिश्रा तूं मला प्राणांहून प्रिय आहेस. अस्तु. तुझ्या सर्व शंका निवारण झाल्या कीं नाहीं !

**मंडनमिश्र**—महाराज, सर्व निवारण झाल्या, परंतु, एक शंका मोठी आहे.

**शंकराचार्य**—बोल बोल शंका ह्मणून ठेवूनकोस. जन्ममरणाला तीच कारण आहे.

**मंडनमिश्र**—एकाकी सद्गुरो:— सर्व वेदांतप्रतिपादक व्यासनारायण आहेत. आणि कर्ममार्गप्रतिपादक त्यांचे शिष्य जैमिनी हे आहेत. मग आपल्या गुरूच्या मार्गास प्रतिकूल असा हा कर्ममार्ग त्यांनीं कां उत्पन्न केला ! व आपल्या मताच्या विरुद्ध मत निर्माण करणाऱ्या शिष्यावरून जसें गुरूचें मन उडावें, तद्वत श्रीव्यासाची प्रीती त्यांजवरून

का उडली नाहीं ? अद्यापी जैमिनी त्यांस प्रिय कसे राहिले ? एवढी शंका आहे, व ती मोठी जाचते आहे.

**शंकराचार्य**—अरे मंडनमिश्रा, आज तूं ज्या ज्या शंका घेतल्यास त्या फारच महत्वाच्या आहेत. अतो आतां या शंकेचेंही निवारण करितों ऐक:— जैमिनींनीं आपल्या गुरू-च्या मार्गास प्रतिकूल नव्हे तर सानुकूलच मत निर्मिलें आहे. कसें जर ह्मणशील तर ऐक:—कर्मावांचून चित्त-शुद्धी नाहीं; आणि चित्तशुद्धीवांचुन आत्मविचारणश्रद्धा बसणें नाहीं. तस्मात माडीवर चढण्यास सुलभ व्हावें म्हणून पाय-ऱ्या लावितात. तद्वत ज्ञानमार्गाची ही वर्तिनी होय. आणखी हा कर्म मार्ग जर नसता, तर मूढ जीव व्यर्थ अधोगतीस जाते. या करितां, जैमिनींनीं, सर्व प्राकृत जीवांवर उपकार करण्याकरितां हा कर्म मार्ग उत्पन्न केला आहे. तस्मात गुरू-च्या मार्गास, प्रतिकूल किंवा सानुकूल हा मार्ग आहे, हें वि-चार करून पाहा म्हणजे कळेल. आणखी, याचा प्रत्यय तुला आतांच आला. तूं आज पर्यंत कर्मे केलीस म्हणून, आनंदाचें विवरण यथार्थ होतांच तुला समधी लागली,

**मंडनमिश्र**—( हात जोडून वर डोळे करून ) भो जैमिने ही शंका एकवार आपण समक्ष येऊन निवारण केली पाहिजे,

(नंतर पडद्यांत शब्द होतो. अरेमंडनमिश्रा, श्रीशंकराचार्य जें म्हणतात तें सर्व आहे. हा मार्ग उत्पन्न करण्यांत हाच माझा हेतू मुख्य होय. )

**मंडनमिश्र**—( शंकराचार्यांचे पाय धरून ) महाराज, ध, न्य धन्य मी या मायाजालांत पडून भ्रांत बुद्धीनें भलतेंच कल्पिलें होतें. परंतु आपण येऊन, मजकडून हवें तें बोलून घे-ऊन, माझा उद्धार केलात. केवढें माझें हें भाग्य ! गुरुमहाराज

आतां विलंब करूं नये, लवकर मला संन्यास देऊन, या संसार पाशांतून मुक्त करावें. आतां मला सर्व हें असार भासत आहे. हा मी मनांत संकल्प केलाच. आतां मलाने घर नको, तें द्रव्य नको, व त्या स्त्रियेचेंही मुख पाहाणें नको. आटपा आटपा लवकर. कोण आहेरे नापिकास बोलावून आणा

( हें ऐकून शिष्यांसह श्रीशंकराचार्य मोठ्या आनंदानें नारायण नारायण असा गजर करितात. )

(तदनंतर सरस्वती प्रवेश करिते. )

**सरस्वती**--( पतीकडे पाहून ) हर हर, मखितकमलमधुकर आज पराभूत झाला काय ! अस्तु. ( शंकराचार्यास ) भो यते, पुढें काय आरंभलें आहेस हें ?

**शंकराचार्य**--सरस्वती, तुझ्या पतीस मी जिंकिलें. तेव्हां प्रतिज्ञे प्रमाणें त्यास संन्यास देतों. तर तूंही त्यास आज्ञा द्यावीस. कारण, तुझ्या ऋणापासून तो मुक्त आहे.

**सरस्वती**—शाबासरे शाबास. मंडनपंडितांस जिंकिल्या वांचूनच कीं त्यास सन्यास देतोस.

**शंकराचार्य**—जिंकला कीं नाहीं. हें त्यासच विचार. व तूं ज्या दोन माळा, त्याच्या कंठांत एक व माझ्याकंठांत एक अशा घातल्या होत्यांस, त्याही पहा म्हणजे त्याची कशी आहे, व माझी कशी आहे, यावरून तुला समजेल.

**सरस्वती**—अरे शंकराचार्या, स्त्री व पती मिळून एक मूर्तिशास्त्राने कल्पिली आहे. तेव्हां मला जिंकिल्या वांचून पूर्ण मंडनमिश्र जिंकला, असें होत नाहीं. तूं अर्धा मंडन जिंकलास. पाहिजेतर अर्ध्या अंगास दे संन्यास परंतु, वामांगास

मी हात लावूं देणार नाहीं. प्रथम मला जिंक, आणि काय कर्तव्य 'असेल तें मग कर.

**शंकराचार्य**--सरस्वती, तूं म्हणतेस त्या प्रमाणें करण्यास आमच्या आश्रमधर्मास विरोध येतो. कारण यतींनीं स्त्रियांशीं वाद करूंनये.

**सरस्वती**—काय हें अज्ञान्या सारखं बोलतोस ? अद्वैत वाद यतींनीं कोणा बरोबरही करण्यास हरकत नाहीं. पूर्वी याज्ञवल्क्या नीं गार्गी बरोबर वाद केला आहे. याच प्रमाणें अनेक दाखले मिळतील. तस्मात मी साफ सांगतें, मला जिंकिल्या वांचून, तुला, पतीस संन्यास, देऊं देणार नाहीं.

**शंकराचार्य**— ( मनांत ) काय तरी लचांड हें इच्यांशीं वाद नकरावा, तर हातचा मंडनमिश्र जातो. व माझ्या कार्यास व्यत्यय येतो. व करावा तर लौकिकांत विरूद्ध- ( विचार करून ) बरें कांहीं कां होईना, वाद इच्याशीं करावाच. मंडनमिश्रास शिष्य करून घेतल्या शिवाय कधीं सोडणार नाहीं. ( उघड ) फार उत्तमआहे. सरस्वती, तुझ्या मनांतून वाद करणें असेल तर बेस अशी समोर. आणि काय प्रश्न कर्तव्य असतील ते कर.

**सरस्वती**— ( समोर बेऊन बसून ) अरे शंकराचर्या, तुझ्या मतें जग हें असत्य आहे. परंतु तें निदर्शनास येत नाहीं तर कसें असत्य, हें सिद्ध कर.

**शंकराचार्य**—सत्य कसें तें तूंच सिद्ध कर आधीं, म्हणजे मग मीं सांगतों.

**सरस्वती**—अरे सत्यत्वास आणखीं प्रमाणें नकोच आहेत

कारण सर्व कालीं हें सारखं दिसतं. याहून अन्य प्रमाणं कोणची पाहिजेत ?

**शंकराचार्य**--सर्वकालीं सारखें दिसतें म्हणतेस, हेंच खोटें आहे सर्वकालीं सारखें दिसत असल्यावर त्यास खोटें कोण ह्मणणार होते.

**सरस्वती**--तर मग तुझ्या मतें, सर्वदा जगाचा अनुभव नाहीं ! तें कसें हें सांग.

**शंकराचार्य**--तुं ज्या वेळीं निद्रावस्थेत असतेस त्या वेळीं तुला स्वप्नें पडतात तेव्हां या जगाचा तुला, कांहीं तरी अनुभव असतो काय ?व ज्या वेळीं सुषुप्तींत असतेस, त्या वेळीं तें स्वप्नांतील जगही नाहीं व हेंही नाहीं. बरें जागृत झालीस म्हणजे-स्वप्नांतील जग नाहीं. एवंच परस्पर कालीं परस्परांचा अभाव मग जगास सत्यता कशी येईल ! रज्जूवर सर्पा प्रमाणें, ब्रम्हस्वरूपावर या जगाचा भास आहे; दुसरें काय ?

**सरस्वती**—( मनांत ) हा मला वादात अटपणार आहे ? ज्यानें माझ्या पतीसही जिंकिलें, तो माझ्यानें कसा जिंकवेल ? किंनि, झालं तरी मी अबला होय. तेव्हां कांहीं कपट करून यास कुंठीत केला पाहिजे. ( उघड )बरं शंकराचार्या, तुझा अद्वैत शास्त्रांत, षड्रिपु जिंकावेत म्हणून सांगितलें आहे. ते षड्रिपु कोणचे ? हें सांग.

**शंकराचार्य**—( हसून ) सरस्वती काय हा तुझा प्रश्न ! अगे ऐक:—१ काम २ क्रोध ३ लोभ ४ मोह ५ मद ६ मत्सर; हे सहा स्वायत्त केले पाहिजेत. त्यांत काम हा अतिशय अजेय आहे. परंतु योग्यापुढें त्याचें कांहीं चालत नाहीं.

**सरस्वती**—मी यते ऐक:-

॥ पृच्छामि वद कामस्य कला भिक्षो किमात्मिकाः ॥
॥ किंत्यश्च किमाधारा स्तथा कामस्य का स्थितिः ॥
॥ पूर्वपक्षे परे नार्यां नरे तिष्ठति वा कथं ॥
॥ एतेषामुत्तरं देहि संविचार्य यतीश्वर ॥ २ ॥

अरे, त्या कामांच्या कला काय आत्मिक आहेत? किती आहेत? कोणच्या आधारानें रहातात ?कामाचीं, मनुष्यांचे ठायीं स्थिति कशी असते? शुक्लपक्षीं आणि कृष्णपक्षीं, नर आणि नारी यां मध्यें त्या कोणकोणच्या ठिकाणीं कसकशा असतात इत्यादि प्रश्नांचें उत्तर नीट विचार करून दे.

**शंकराचार्य**—( विचार करित स्तब्ध बसतात )

**सरस्वती**—कां आचार्या ! मौन कां धरिलेंस ! अरे, मीं तुला जिंकिलें कीं काय? एवढयाश्या प्रश्नांचें तुला उत्तर देतां येईना ! ! मग तूं सर्वज्ञ कसला ?

**शंकराचार्य**—सरस्वती; या प्रश्नांचें उत्तर तुला, आज पासून एक महिन्याच्या आंत देतों. तों पर्यंत मला अवधि दे.

**सरस्वती**—फार उत्तम आहे. असें ह्मटलेंस ह्मणूनच निभावलास नाहींपेक्षां तुला जिंकितच होतें. असो जा.एक महिन्या पर्यंत तरी पतीस संन्यासनामक अपमृत्युंतून चुकविलें किं नाहीं ( पतीस ) माहाराज चलावें घरीं.

( असें झाल्यावर सरस्वती मंडमनिश्र आदिकरून पंडित निघून जातात.

**पद्मपादाचार्य**—महाराज, आपण हें काय केलें. ह्मतांत आलेला मंडन सांडला यास काय ह्मणावें ?

**शंकराचार्य**—अरे, तिनें प्रश्नच विपरीत केला. म्हणून पुढें बोलता येईना.

**पद्मपादाचार्य**—गुरुवर्य आपणास कोणतें अवगत नाहीं? कामशास्त्र झालें म्हणून काय झालें? आपण सर्वेश्वर आहां, उत्तर दिलें असतें तर काय झालें असतें?

**शंकराचार्य**—तसें नव्हे. उत्तर देण्यास योग्य नव्हते, कारण मी तिच्या प्रश्नाचें उत्तर दिलें असतें, तर तीं असें म्हणते कीं, "तूं ब्रम्हचारी होतास, नंतर एकदम संन्याशी झालास; मग हें शास्त्र कधीं शिकलास! तस्मात तूं भ्रष्ट आहेस."

**पद्मपादाचार्य**—आपण एकमासाची अवधी घेतली आहे, तेणें करून आतां काय करणार.

**शंकराचार्य**- सांगतो ऐक:—या वेळीं अमरक नांवाचा राजा मृत्यु पावला आहे, व त्याचें प्रेत स्मशानांत दहन करण्यास आणिलें आहे, हें मीं अंतरदृष्टया जाणिलें. तव्हां माझा जीव योगबळें त्यांत प्रविष्टकरून, त्या राजाच्या शंभर स्त्रिया आहेत, त्यांशीं विलास करून, सर्व कामशास्त्र जाणिल्यें निमित्त करून एकमासांत पुन्हा या पूर्वकलेवरांत येतों. तुम्हीं तों पावतों हा माझा देह या गुहेंत ठेवून संरक्षण करीत बसा.

**पद्मपादाचार्य**—महाराज, हें आपण अगदीं करूंनये, या पासून अनर्थ होईल तो मंडन नाहीं मिळाला तरी चिंता नाहीं कारण पूर्वी मच्छिंद्रनाथ म्हणून महायोगी होते ते असाच राज देहांत प्रवेश करून स्त्रीलंपट होऊन, आत्मस्वरूप विसरले मग त्यांचा शिष्य गोरक्ष म्हणून होता तो जाऊन गुरूस घेऊन आला असा मागील इतिहास आहे. तर आपण येवेढं संकट आह्मांवर येऊं देऊं नये,

**शंकराचार्य**—अरे कायही तुमची शंका! मी कां स्त्रियास लुब्ध होऊन इकडील सर्व विसरेन! हा विकार माझ्या ठायीं संभवण्याची मुळीच भीति मनांत आणूनका. स्वस्थ एक मास पर्यंत या शवाचे रक्षण करीत बसा, मी तितक्या वेळेंत परत येतों. असो, आतां मला विलंब होतोकारण त्या राजाचा देह, आतां चितेवर ठेवणार आहेत. ( असें म्हणून प्राणायाम करून देह विसर्जन करितात, तो लागलाच देह अडवा पडतो. सर्व शिष्य देह उचलुनघेऊन नारायण नारायण करीत निघून जातात. )

मंडनमिश्रपरकायाप्रवेशोनाम चवथा

अंक समाप्त



# अंक ५.



## येणारी पात्रें.

---

| | | |
|---|---|---|
| १ सुविचार | .... .... .... | अमरकराजाचा प्रधान. |
| २ विचक्षण | .... .... | त्याचा न्यायाधीश. |
| ३ बुद्धिमंत | .... .... .... .... | द्वारपाल. |
| ४ वासंतिका<br>५ माधविका | .... | राणीमहालांतील दोन दासी. |
| ६ मदनमंजिरी | .... .... | अमरक राजाची राणी. |
| ७ शिष्य | .... .... .... | तिचा शागिर्द. |
| ८ पद्मपादाचार्य<br>९ हस्तामलाचार्य<br>१० त्रोटकाचार्य<br>११ चिदाभासाचार्य | .... | शंकराचार्यांचे शिष्य. |
| १२ अमरक | .... | ज्याच्या कलेवरांत आचार्यांनीं प्रवेश केला तो राजा. |
| १३ शंकराचार्य | .... | जगद्गुरू ( शिवाचा अवतार. ) |

१४ मंडनामिश्र .... { ब्राह्मण पंडित ( ब्रह्मदेवाचा अवतार. )

१५ सरस्वती .... .... .... त्याची स्त्री.

१६ सुधन्वा .... .... राजा ( इंद्राचा अवतार. )

१७ वैतालिक .... .... .... .... चोपदार.

१८ आर्याअंबा .... .... शंकराचार्यांची माता.

१९ जटाधर
२० पिंगाक्ष } .... .... दोन शिवगण.

२१ ब्रह्मदेव
२५ इंद्र } .... आदि करून अनेक देव.

# अंक ५.

## प्रवेश १.

### [स्थळ—अमरकराजाच्या नगरींतील राजकचेरी.]

( तदनंतर अमरकराजाचा सुविचारनामक प्रधान व विचक्षणनामक न्यायाधीश प्रवेश करितात. )

**सुविचार**— ( आसनावर बसून ) या न्यायाधीश. तुम्हाशीं कांहीं गुप्त विचार करण्याचा आहे, ह्मणून बोलावू पाठविलें.

**विचक्षण**—मंत्रिवर्य, मीही आपला निरोप येतांच हातचें सर्व काम एकीकडे ठेवून तसाच आलों. काय विचार करण्याचा असेल तो आतां काढावा. यठिकाणीं तिसरें कोणी नाहीं.

**सुविचार**—कोण आहेरे तिकडे ? ( इतक्यांत द्वारपाल येतो. )

**द्वारपाळ**—( मुजरा करून ) सरकार, मी आहें. काय आज्ञा.

**सुविचार**—बुद्धिमंता, इकडे गेरराभा ठेवावा. आणि आम्हांस कळविल्यावांचून कोणास आंत सोडूंनये.

**द्वारपाल**---आज्ञेप्रमाणें करण्यास ताबेदार हजर आहे.

( असें म्हणून पुन: मुजरा करून निघून जातो. )

**सुविचार**---अहो न्यायाधीश, महाराजांचें पुनर्जीवन आपण ऐकिलेंच असेल.

**विचक्षण**—ऐकिलें ह्मणजे ? मी त्या ठिकाणीं होतोंच. एकूण असा चमत्कार मात्र मी आजपर्यंत पाहिला नाहीं; व ऐकिलाही नाहीं. अहो त्यांत कांहीं तरी बाकी होती काय ! मोठमोठ्या राजवैद्यांनीं परिक्षा केल्या, नंतर स्मशानांत नेलें. परंतु जसा एखादा निजून उठतो,तद्वत महाराज उठून बसले. पण कायहो, ज्या व्याधीनें सरकारास इतकें ग्लान केलें, ती व्याधीही नाहींशी झाली. पहा, आमच्या आकलें बाहेरील काम हें. अशी अघटित रचना सर्वेश्वरास आवडूनच झाली आहे. असनू. या राजधानीचा हा उत्कर्षच समजला पाहिजे.

**सुविचार**---या गोष्टीची मला एक शंका आली आहे. कारण, सरकारचा व्याधी नाहींसा होऊन पुन: जिवंत झाले, एवढेंच नव्हें, तर त्यांचा सर्व स्वभावही पालटला आहे, तेव्हां आमचे महाराज एक वेळ जे गेले, ते गेलेच. आणि हे दुसरेच कोणी असावे; असें मला वाटतें.

**विचक्षण**---हें काय म्हणता हें मला कळत नाहीं, तर स्पष्ट तुम्हास जी शंका आली असेल ती कळवा.

**सुविचार**---अहो, आमच्या सरकारास सहीच्या अक्षरांवांचून बाकींचीं अक्षरें मुळींच कळत नव्हती, कारण अध्ययन तेवढेंच. परंतु, हल्लीं निवाडे स्वत: लिहितात; कामात किती हुशारी ! सर्व गोष्टीवर केवढें लक्ष ! कोण कामगार कसें काम करितो, कोण कसा वागतो, इकडे किती बारीक दृष्टी ! प्रजा

आपणास कंटाळली किंवा राजी आहे, याची किती चमत्कारिक रीतीनें चवकशी ! केवढें वक्तृत्व ! तर हे गुण आमच्या महाराजांच्या आंगांत मुळींच नव्हते, ते एकदम कर्से आले ?

**विचक्षण**—ही कायहो भलतीच शंका ? परमेश्वर देण्यास तयार झाला म्हणजे काय देणार नाहीं ! ज्ञा त्यांस पुनः जीव दिला, तद्वतच हे अलौकिक गुणही दिले असतील.

**सुविचार**—छे, छे, अशा बोलण्यानें तुमच्या विचक्षण नांवास कालिमा येते. अहो, त्यांतील बीज निराळेंच आहे.

**विचक्षण**—काय आहे तें सांगा तरी. आपली कांहीं त्यांत अक्कल चालत नाहीं. याविषयीं मलाही एकवार शंका आली, ती कोणती ह्मणाल तर ऐका:—एका खटल्याचा निकाल मी माझ्या न्यायदृष्टीनें केला. त्यावर, ज्याच्या प्रतिकूल तो न्याय झाला होता, त्याणें महाराजांपाशीं फिर्याद केली. त्यांत फार खुबीदार चवकशी केली आणि शेवटीं निवाडाही फारच योग्य सरकारांनीं दिला. तें पाहून मी चकितच झालों, आणि पहिल्या ज्ञानाची तुलना केली तर जमीन अस्मानाची तफावत दिसली. त्यावेळीं हें सर्व ईश देणें आहे असें समजून, त्याचेच उपकार मानून स्वस्थ बसलों.

**सुविचार**—मला वाटतें, कोण्या योग्यानें राजयोग करण्याकरितां, आपलें प्रेत कोठें तरी ठेवून, या राजशरीरांत प्रवेश केला आहे. यांत कांहीं भ्रांती नाहीं.

**विचक्षण**—हें कशावरून पण तुम्हीं सिद्ध करितां ! अहो ते योगी निरिच्छ असतात, त्यांत या कटकटींत काय सुख आहे !

**सुविचार**—मी, हें केवळ आपल्याच आकलेनें ह्मणतों, असें

नाहीं हीच शंका, मी राजपुरोहितांस एकवेळ कळविली तेव्हां त्यांणीं पूर्ण विचार करून सांगितलें कीं " हा कोणी महा योगी आहे, व अशा गोष्टी आज पर्यंत पुष्कळ ठिकाणीं घडल्या आहेत कारण योगी राजयोग साधण्या करितां अशीं कृत्ये करितात. "

**विचक्षण**—तर मग दैवानें, हाच राजा आह्मांस चिरकाळ ठेविल्यास, कितीवरें सुख होईल!

**सुविचार**— माझीही इच्छा तीच आहे; व पुर्ण होण्याकरि तांच मी इतकी बारीक चवकशी चालविली आहे.

**विचक्षण**—बरें हाच योगी, या राजशरीरांत चिरकाल असावा याविषयीं कांहीं युक्ती, गुरूजीस तुम्हीं विचारा कीं.

**सुविचार**—अहो, विचारली, व त्याणींही मला सांगितली, आणि ती मला योग्यशी वाटली.

**विचक्षण**—कोणची ती, सांगा पाहू.

**सुविचार**—आम्ही, पुष्कळ राजदूत, सर्व पृथ्वीवर संचार करण्या करितां पाठवावे, व त्यांणीं, जें प्रेत दृष्टीस पडेल ते ते जाळून टाकावें अशी त्यांस आज्ञा करावी. म्हणजे अर्थातच, त्या योग्याचें मूळ शरीर नाहींसें होईल, व तो येथेंच चिरकाल राहील.

**विचक्षण**—शाबास उत्तम युक्ती ही. बरें मग त्यास विलंब कां! कांहीं विश्वासू सेवक त्या कामावर नेमून पाठवून या॰ म्हणजे झालें.

**सुविचार**—पाठवितों. पण अगोदर राणीमहालांत जाऊन, कांहीं राजास्त्रियांपाशीं माझी सलग चालते, त्यांस ह्या गोष्टी विषयीं, कांहीं शंका आली आहे किंवा कसें, एतद्विषयीं विचार काढून, नंतर ती तजवीज करवितों.

**विचक्षण**—बरेंतर. मग मला सर्व तुम्हीं कळवालच. जातों तर मी आतां.

**सुविचार**—चला मी ही तिकडे जातों.

( असें म्हणून दोघे निघून जातात. )

---

## प्रवेश २.

### ( स्थळ—राजाचा आनंदकुंज नांवाचा बाग )

( तदनंतर राणीमाहालांतील वासंतिका आणि माधविका या नांवांच्या दोन दासी प्रवेश करितात. )

**माधविका**—सखे वासंतिके, तारुण्याच्या भरांत मत्तकरिणी आली असतां, अजूबाजूच्या झाडांकडे न पाहातां उन्मत्त होऊन जसी संचार करिते, तशी तूं, मी येथें उभी असतां मजकडे नपाहातां, न्हृदयावरील कनककलशांकडे दृष्टी देऊन, नम्रत्यानें कोणीकडे चाललीस?

**वासंतिका**—अग बाई, माझी प्रियसखी माधविका काय! सखे मन दुसरेकडे असले म्हणजे जवळ कोणचाही पदार्थ असला तरी दिसत नाही. म्हणून बाई तुला मी पाहिलें नाहीं याची मला क्षमा कर. ( असें म्हणून तिचा हात धरिते. )

**माधविका**—सखे वासंतिके, ज्यानें तुझें मन आपणाकडे वेधून घेतले, असा कोण भाग्यवान पुरुष या राजनगरींत उत्पन्न झाला आहे!

**वासंतिका**— ( लाजून ) गडे तू म्हणतेस तसें होण्याचें हें माझें वय तरी काय? अद्यापि तें मला कांहीं समजत नाहीं.

**माधविका**—अगे ज्या मंदिरांत नेहमीं शृंगारमेघाचें दुर्दिन झालें असतें, व जेथें मदन मूर्ती राजाधिराज माहाराजांची स्वारी, पुर्ण विकसित कमलावर भ्रमरा प्रमाणें, तल्लीन होऊन निमग्न झाली असते, अशा त्या मदनमंजिरी बाईसाहेबाच्या मंदिरांत तूं असणारी मग तुला अद्यापि तें कळत नाहीं, हें म्हणणें खरें दिसेल काय ? तशांतून तारुण्य पुष्पांचा तुझ्या शरीर वल्लरीवर पूर्ण बहर आला असतां; कामिमधुपाचे चुंबनसौख्य माहित नाहीं हें म्हणण मला खरें वाटेल काय?

**वासंतिका**—सखे बोलण्यांत कीती तरी अलंकार केलेसहे ! म्हणूनच बाई तुझी पट्टराणी शृंगारचंद्रिकाबाईसाहेबांच्या मंदिरांत नेमणूक आहे ती.

**माधविका**--अगे आतां आमच्या बोलण्यातच अलंकार; तुझ्याप्रमाणें, हाव, भाव, कटाक्ष आदिकरून शरीरअलंकार करण्याचे कां माझे दिवस आहेत ?

**वासंतिका**—पुरेबाई. तुझ्याबरोबर बोलण्यास कां मी टिकणार आहे ?जळो ते. पण तूं कोणीकडे चाललीस?

**माधविका**—सांगते पण तुं कोणाजवळ न बोलशील तर

**वासंतिका**—सखे अद्यापि नूं माझी परीक्षा केली नाहींसना? अगे जरी आह्मी' परस्पर सापत्न भाव आचरणाऱ्या राजस्त्रीयांच्या दासी आहों, तरी तुम्ही आम्हीं कशा वागतो हें नाहीं कां तूं जाणत ?

**माधविका**—सखे, म्हणूनच सांगते ऐक:-काल रात्रीं महाराज आमच्या बाईसाहेबाच्या तडाक्यांत अवचित सापडले,

ते वेळी, रडून कहून " पुनः मी मदममंजिरीचें मुख पहाणार नाहीं," असें वचन घेऊन मग महाराजांची व त्यांची एक शय्या झाली. आणि आतां पुनः त्यांस असें वर्तमान लागलें आहे कीं सांप्रत महाराज, आनंदकुंज बागेतील जलमंदिरांत, मदनमंजिरीबाईसाहेबांसह आहेत. तेव्हां खरें कीं काय हें पाहण्यास त्यांनीं मला पाठविलें आहे. म्हणून गुप्तरूपें मी आलें आहे. समजलीस ?

**वासंतिका**—अगे शुष्ककमलिनीवर जसा भ्रमर विटतो, तद्वत महाराज, त्या वृद्ध स्त्रियेच्या रतीविषयीं विटलें असतां पुनः त्या लचांडांत कसें सांपडले? हेंच बाई मला आश्चर्य वाटतें.

---

**माधविका**—सखे, पित्त झाल्या वांचून, कुटकीचे कोण सेवन करील! त्यांची गाठ पडण्याचें कारण निराळेंच आहे.

**वासंतिका**—तें कोणचें! सांग तरी.

**माधविका**—बाईसाहेबांनीं एका व्रताचें उद्यापन केलें त्याच्या सांगतेकरितां महाराज काल तिकडे आले होते, व भोजन ही तिकडेच झालें. नंतर, अर्थातच मग कोठें जातात! ना इलाज होऊन तेथेंच राहिले.

**माधविका**—सखे बहूवल्लभात्व पुरुषांस मोठें अमुख उत्पन्न करितें. पहा. आतां तूं तिकडे, महाराज आमच्या बाईसाहेबांसह या बागेत आहेत, असें सांगशील, मग ती वृद्धा सरकारांस बोचून बोचून खाईल.

**माधविका**—(हांसून) सखे या वरुन महाराज येथेंच आहेत असें सिद्ध झालेंच. झालें माझें काम जातें तर आतां

**वासंतिका**—अगबाई बोलण्याच्या भरांत जी गुप्त गोष्ट रा-

खण्याची ती बाहेर फुटली तर सख मजवर दया कर, आणि हे रहस्य बाहेर फोडूनकास.

माधविका—बरें तें असो. सखे, गडबडीनें तू कोणीकडे निघालीस ! आणि महाराजांची व तुझ्या यजमाननीची जेव्हां गाठ पडली तेव्हां काय काय मौज झाली तें सांग.

वासंतिका—काल महाराज मंदिरांत नव्हते त्यावेळीं काय सांगु ! दाण्याचा वेळ टळून गेला म्हणजे मस्त शिंगी जशी ठाण्यावर उच्छाद करिते, तद्वत बाईसाहेबांनीं आरंभिलें. उपहार घेईनात. सर्वदासींनां "गुप्तपणें जाऊन कोणाच्या मंदिरांत आहेत हा शोध घेऊन या." अशी आज्ञा करून पाठविलें. त्यावेळी आम्ही सर्वत्रांनीं शंभरही राजांगनांची मंदिरें शोधली परंतु ठिकाण नाहीं. पण शेवटीं " आज पट्टराणी साहेबांच्या मंदिरांत स्वारी आहे " असें मला कळलें. तें जाऊन सांगतांच, संतापलेल्या नागीणी प्रमाणें फुसकारे टाकीतच पलंगावरून खालीं उतरल्या; व सर्व आंगावरील दागीनें काढून टाकून जमीनीवर धाडकरून पडल्या.

माधविका—कोणग बाई तरी रागहा ! मला ठाऊक आहे, सर्व राजांगनांत तापटपणानें सत्यभामेसही लाजविणारी तीच एक आहे. बरें, पुढें मग ?

वासंतिका—नंतर आम्ही, घाबरून सर्वजणी जवळ गेलों पण फळ काय ! एकीलाही हात लावूं देईनात. "मी जीव देणार पुनः सरकारास आतां तोंड दाखविणार नाहीं" ह्या मंत्राच जप चालला. मग मी जवळ जाऊन पुष्कळ समाधानाच्या गोष्टी सांगितल्या त्या वेळीं अमळ राग शांत झाला. पण नेत्रांतून जे पाट चालले होते ते कांहीं बंद झाले नाहींत; इत-

क्यांत उजाडलें. मग अगदि ग्लान झाल्या जाणून हळूच उच-लून मंचकावर निजविलें; तोंच सरकारही, जागरणानें निस्तेज झालेली मुद्रा, शेल्याच्या पदरानें लपवित, मंचकावर येऊन बसले.

**माधविका**—हर हर ! महाराजांस मात्र सौख्य नाहीं; का-रण काल रात्रीं तिकडेही रात्रभर हीच दशा झाली.

**वासंतिका**—म्हणजे ! पट्टराणी बाईसाहेबांनीं सरकारास मो-ठ्या प्रीतीनें तेथें गढून घेतलें असून, तेथें हीच दशा हो-ण्याचें कारण काय !

**माधविका**—तें सर्व खरें परंतु, ज्यावेळीं मंचकावर उभयतां बसली, त्यावेळीं बाईसाहेब, यजमान फार दिवस आले नाहींत या रागानें मौन धरून बसल्या.

**वासंतिका**—सखे, तें मौन किती वेळ टिकलें असेल ! चि-रक्षुधित ब्राम्हणापुढें पंचपक्वान्नाचें ताट ठेविलें म्हणजे त्याच्यानें फार वेळ धीर धरवत नाहीं, तद्वत त्यांना झालें असेल नाहीं काय !

**माधविका**—तसेंच होईल, असें आम्हांसही प्रथम वा-टलें होतें. परंतु काल ओढून ताणून चंद्रबळ फारच वेळ आणि-लें होतें. जों जों यजमान आर्जव करीत तों तों राग फारच च-ढला, आणि जशी नवयुवती प्रथम संगकालीं पतीचा करस्पर्श होताच जसें चापल्य दाखविते, तद्वत प्रकार जाहला अ-सतां,आम्हांस वाटलें कीं, बाईसाहेबांचें यौवन परावृत्तच झालें आहे.

**वासंतिका**—पण सखे, अता तो तमाशा किती वेळ चाल-ला होता ?

**माधविका**—सखे, काय सांगू, तुला खोटें वाटेल. अरूणोदया पर्यंत याप्रमाणें चाललें होतें. सरकारांनीं आपली सर्व अक्कल खर्च केली परंतु व्यर्थ. एकवार जी तोंडास खीळ बसली होती ती कांहीं निघाली नाहीं. मग सरकारांनीं, खिन्न होऊन एक श्लोक म्हटला, तो कांहीं माझ्या ध्यानांत राहिला नाहीं, परंतु त्यातला भाव ध्यानांत आहे. तो पाहिजे तर सांगतें.

**वासंतिका**—सांग सांग. सखे, त्या गुणनिधीचें भाषण ऐकावेंसें वाटतें.

**माधविका**—सखे, अरूणोदयाच्या वेळीं. सरकारांनीं कंटाळून श्लोक म्हटला, त्यांतील भावार्थ असा.

"हे कृशोदरी, रात्र कृश झाली परंतु तुझें मन कृश होईना,"

"पूर्वदिशा अनुरागिणी झाली तथापी, तुज मध्यें रागोदय होईना,"

"हें आकाश प्रसन्न झालें परंतु तुझ्या मुखावर प्रसन्नता येत नाहीं,"

"पक्षीही शब्द करूंलागले तरी तूं मौन सोडीनास, आतां काय करूं!"

**वासंतिका**—हर हर! इतकें झालें तरी, त्या निर्दयेच्या अंतःकरणात दयेचा पाझर फुटला नाहींना?

**माधविका**—मग मात्र मौन जें धरिलें होतें तें सोडिलें. आणि "मदन मंजिरीचें पुनः मुख पाहाणार नाहीं असें वचन द्याल तर-" अशी मुखांतून मुका फळें पडलीं.

**वासंतिका**—ह्याचें नांव सापत्नभाव. बरें मग?

**माधविका**—मग सरकारांनीं, बाईसाहेबांच्या मर्जीप्रमाणें वचन दिलें. आणि पटकाभर मंदिरांत विश्रांती घेतात, तोंच

प्रभातमंगलरवमिश्रित स्तुतिपाठकांच्या शब्दांनी महाराजांस, त्या· खी बहुपाशांतून बाहेर ओढिलें. मग सरकार मुखमार्जन करून. इकडे आले, हें जाणून शोधार्थ मला पाठविलें आहे. आतां तुझ्या यजमानणीची आणि सरकारांची गांठ पडतांच कसा काय रंग उडाला ! हें सांग.

**वासंतिका**—भाषणें कांहींच झालीं नाहींत. सरकार येऊन मंचकावर बसले, हें पाहून बाईसाहेब उठल्या; व माझा हात धरून ह्मणाल्या कीं, "माझी आंग धुण्याची वेळ झाली, तर मला तिकडे घेऊन चल." व इतर दासींना आज्ञा केली कीं, "सरकार काल रात्रीं श्रमून, जागून आले आहेत, या करितां त्यांस मंचकावर निद्रा घेऊंदे; व तुह्मी त्यांच्या इच्छे प्रमाणें सेवेंत तत्पर असावें." इतकें झाल्यावर, बाईसाहेबांस घेऊन मी न्हाणीघरांत गेलें, व तेथें नित्या प्रमाणें आंगधुणें होऊन, पीतांबर नेसून देवगृहांत पूजेस बाईसाहेब बसल्या. आणि मला "महाराजां पाशीं ऐस" असें सांगितलें, ह्मणून मी तिकडे चाललें.

**माधविका**—झालें तर. आतां मी जातें ( असें म्हणून निघून जातें.

तदनंतर सुविचार प्रधान प्रवेश करितो.

**सुविचार**—( पुढें पाहून ) ही. मदनमंजिरीबाईसाहेबांची दासी वासंतिका चालली आहे, तर इला विचारावें. ( असें ह्मणून वासंतिकेस ) अगे वासंतिके, इकडे ये, तुजकडे फारच निकडीचें काम आहे.

**वासंतिका**—( मागेपाहून ) कोण प्रधानजी ? ( असें म्हणून जवळ जाऊन ) माहाराज काय आज्ञा आहे.

**सुविचार**—वासंतिके, मला, मदनमंजिरीबाईसाहेबांची भेट एकांतीं घेणें आहे, तर तो योग कसा आणितेस आण पाहु ! मला ठाऊक आहे तूं त्यांच्या परम प्रीतींतली आहेस; तेव्हां हें बस्तान, तुझ्या हातून जसे बसेल, तसें इतराच्या हस्तें बसणार नाहीं.

**वासंतिका**—महाराज, तर मग हीच वेळ. तूर्त बाईसाहेब-आंगधूऊन, देवगृहांत पूजा करीत, एकट्याच बसल्या आहेत, आपण चलावें ह्मणजे झालें.

**सुविचार**—पण मी आलों आहे, असें कळवून परवानगी आण.

**वासंतिका**—ठीक आहे. मजबरोबर यावें. ( असें म्हणून दोघे निघून जातात. )

---

## प्रवेश ३.

### ( स्थळ—राणीचें देवगृह. )

( मदनंतर शिष्यासह, पुजाकरणारी आसनस्थ मदन मंजीरी प्रवेश करिते. )

**मदनमंजरी**—( शिष्यास ) अरे देवांस मीं स्नान घातलें. आतां सर्व देव पुसून ठेव. आणि ज्या मूर्तींचे त्या मुर्तीस सर्व अलंकार नीट घाल.

**शिष्य**—आज्ञा बाईसाहेब. ( असें म्हणून देव पुसून, अलं-

कार चालतो; इतक्यांत रात्रीच्या जागरणा मुळें मदनमंजिरीस डुलकी येते, व ती मागील टेकायाच्या पाटावर मान ठेऊन झोंपी जाते. हें पाहून शिष्यही उगीच विचार करीत उभा राहातो. )

( इतक्यांत सुविचार व वासंतिका प्रवेश करितात. )

**वासंतिका**—दिवाणसाहेब असे. या. ( दोन पावलें चालून ) महाराज, ह्या बाईसाहेब, देवाची अनन्य भावें पुजा करीत येथें बसल्या आहेत. तर त्यांस आपण आल्याबद्दल कळवितें, तों पर्यंत आपण येथेंच असावें.

**सुविचार**—ठीक आहे. तु जाऊन सरकारास कळवून, मला येण्याबद्दल परवानगी घेऊन यावी.

**वासंतिका**—आज्ञा. ( असें म्हणून जवळ जाऊन तीस्थिती पाहून ) काय बाईसाहेब ध्यानस्थ आहेत, किंवा झोंपेंत आहेत? ( विचार करून ) अरेरे! समजलें. कमलवनांत संचार करीत असतां, आपल्या प्रियाच्या आणि आपल्या आड जर कमलपत्र आलें, तर महादुःख मानणाऱ्या चक्रवाकीला जर कांहीं काल तो जिवलगाचा वियोग सहन करण्याचा प्रसंग आला तर जें दुःख व्हावें तें, आमच्या बाईसाहेबांस काल रात्रभर जागरण झाल्या कारणानें, सांप्रत निद्रावश झाल्यामुळें, पातालकेतूनेंच मोहिनीमंत्र घालून, निश्चेष्टित केलेली जी गंधर्वकन्या मदालसा, तिजप्रमाणें आमच्या बाईसाहेब शोभताहेत. ( मग खुणेनें प्रधानास जवळ बोलविते, व प्रधानही येतो. )

**सुविचार**—काग दासी, बाईसाहेबांचा हुकुम घेतलास का?

**वासंतिका**—महाराज, बाईसाहेब किंचित झोंपेंत आहेतसें

वाटलें. तर क्षणभर काय चमत्कार होतो पाहुंया. ( असें म्हणून दोघेही पडद्यांत उभे रहातात )

मदनमंजीरी—( झोपेंतच ) प्राणवल्लभा, सर्व रात्रभर अस्खलित्रवती प्रमाणें गलितत्रपीयेवर मदनछत्र होऊन, कुपात्रस्पर्शी सत्पात्रता मानून, वात्स्यायनसूत्रवृत्तीचा अनुभव घेण्याकरितां, तो शृंगाररसप्रदीपित झालात; परंतु आर्यपुत्रा, प्रीतिहोत्र पतित शुष्कपर्णंधन या अबलेचें गात्र आपल्या वियोगानलें भस्म मात्र होईल, याची दया आपल्यास तिळमात्र कशी हो नाहीं आली.

सुविचार—( पाहून ) कांगे दासी, अकालीं हें बाईसाहेबांचें भाषण असंबद्ध नव्हे काय!

वासंतिका—माहाराज त्यांतील बीज निराळेंच आहे. तें आपणास सांगितल्या वांचून कळणार नाहीं. परंतु, हें सर्व झोपेंतील आहे.

सुविचार—अगे, यांस्तव मी जाणिलें. याजवरून काल रात्रीं महाराज अन्य मंदिरीं होते.

वासंतिका—( गालांतल्या गालांत हसून ) बरें पुढें काय होतें हें पाहूं.

मदनमंजीरी—( झोपेंतच ) प्राणनाथ, इष्टजनाला तुष्ट करण्याकारितां, मला कष्ट देऊन त्या नष्टमन्मथेला यथेष्ट रति देण्यांत आपला अधर मात्र भ्रष्ट केलात. आणि चंद्राकिरणाची प्रचंड किरणें, या ब्रह्मांडमंडलावर तांडव करुं [ लागली ] असतां, त्या मदभरित स्त्रियेच्या शर्यदग्ध सर्व करण्याकरितां सर्व शर्वरींत निद्रा न मिळाल्यानें निस्तेज झालेलें पर्वशशीमुख, पदरांचलानें आच्छादित करून, माझें समाधान करण्याकारितां आलात काय? तर मी आपणाशीं भाषणच वर्ज केलें.

**वासंतिका**—( हर्षानें ) अरेरे रात्रभर घोकत असलेले वि-चार, या वेळीं निद्राभरांत असल्यामुळें, बाईसाहेबांच्या मुखांतून सहज बाहेर पडताहेत.

**सुविचार**—वासंतिके, पण भाषणांत प्रासांची योजना कशी सहज होते ही पाहिलीस कां ? सकळविद्यानिधी महाराजांचा यांस निकट सहवास नेहमीं असल्यामुळें, स्पर्शमण्याशीं लोहाचें ऐक्य होतांच तें जसें सुवर्णत्व पावतें, मद्गत होऊन, बाईसाहे-बांची वाणी सरस्वतीचें अधिष्ठानच झाली आहे. असो आतां पुढें काय होतें पाहावें.

**वासंतिका**—आज सरकार सूर्योदयीं मंदिरांत आले, त्या वेळेचें अनुसंधान आहे हें. पण आतां पुढें काय बोलतात पाहूं.

**मदनमंजिरी**—( झोपेंतच ) व: "चूक झाली" म्हणून पाय धरण्यास लाजही नाहीं वाटत. ( अंमळ थांबून ) पण अ-तां मला कोठें बसायला अवधी आहे ? माझी आंग धुण्याची वेळ नाहीं कां झाली ! वासंतिके, मला आंग धुण्याचें आहे. तर तिकडे चल. ( असें म्हणून उठून चालूं लागते. मध्यान घाबरून दूर जातो. तोंच जागृत होऊन लाजून पुनः खालीं बसते. ) वा-संतिके, तूं केव्हां येथें आलीस ?

**वासंतिका**—बाईसाहेब आपण, उदयीकमहाराजांचीं गाठ पडतांच, असें बोलायचें, म्हणून रात्रभर खटपट करून, जी प्रा-सयुक्त वाक्य रचना करून ठेविली होती ती आपल्या मुखांतून सहज आज झोंपेंत बाहेर आलें.

**मदनमंजिरी**—सखे, हा स्वप्नमत्सरसंजावास, माझ्या सो-भाग्याचा सुखद करितो. बर आतां कायगे करूं ? आज मला पुजा करण्याचि कांहीं सुचेना

वासंतिका—बाईसाहेब आपलें कोमल चित्त, या दुष्ट राजाच्या सपाट्यांत जाऊं देऊंनका. भलताच परिणाम होईल. याकरितां सांगतें, कांहीं तरी विचार करा, म्हणजे इतकी पीडा होणार नाहीं.

मदनमंजरी—( त्रासून ) कसलागे विचार करण्यास सांगतेस ! महाराजांनीं, मजशीं कपट करून, त्या थेरडीचें आर्जव करण्यांत सर्व रात्र घालविली, हा लहान अपराध केला काय ? तर पुनः देवा, त्या धूर्ताचें मला मुखही पहाणें नको.

वासंतिका—बाईसाहेब बोलते याचा राग येऊं नयाल तर खरें तें सांगेन.

मदनमंजिरी—बोल. बोल. तुझें भाषण मला अमृताहून गोड लागते.

वासंतिका—सरकार, पर्जन्यास सर्व देशांतील चातक सारिखे आहेत. पाळी पाळीनें सर्वांची मनें, तो जर न शांत करील तर त्यास जीवनंद कोण म्हणेल !

मदनमंजिरी—( विचार करून ) शाबास दासी शाबास तुझें हें चातुर्य पाहून, तुला दासी म्हणण्याची मला लाज वाटते. सखे, मी उगीच त्या मच्छरीरबाळिरसंताप दूषणें देऊन बोलले.

वासंतिका—पण सरकार, हे आपले प्रधानमंत्र, आपणाशीं कांहीं बोलण्या करितां आले आहेत. तर आज्ञा असल्यास त्यांस जवळ हांक मारितें.

मदनमंजिरी—कोण सुविचार काय ? अः काय चमत्कार तरी ! माझ्या मनांतील दुर्विचार नाहींसे होतांच सुविचार आले !

दासी येथें अगोदर एक आसन आणून ठेव, नंतर त्यास हाक मार.

**वासंतिका**—आज्ञा ( असें म्हणून आसन आणून ठेवून, प्रधानास सुगणें जवळ बोलाविते. प्रधानही येऊन, नमस्कार करून आसनावर बसतो, )

**मदनमंजिरी**—( पूजा संपवून शिष्यास ) अरे, देव आंत नेऊन ठेव. आणि माझी जपाची माळ आणून दे.

**शिष्य**—आज्ञा ( असें म्हणून देव आंत घेऊन जातो व माळ घेऊन पुनः येतो; ) सरकार ही माळ ( असें म्हणून माळा मदनमंजिरीचे हातीं देतो. )

**मदनमंजिरी**—( माळा पदरांत घेऊन प्रधानाकडे तोंड करून ) कां दिवाणजी, तुम्ही कामा शिवाय उगीच यणार नव्हेत, आणि ज्य पेक्षां कचेरीच्या वेळेत इकडे आलां आहां, त्या पेक्षां कांहीं तुमची मोठी मसलत दिसते.

**सुविचार**—माहाराज, असें तार्किक ज्ञान आपणामध्यें आहे, म्हणूनच, सर्व राजांगनांत, आपणच चातुर्यशिरोमणि अशी कीर्ती दिगांतरीं पसरली आहे. आपण खरें जाणिलें. मी कांहीं मसलतीनेंच आलों आहे.

**मदनमंजिरी**—मग उशीर कां ? सांगा काय तें.

**सुविचार**—सरकार ते विचार फारच गुप्त आहेत या करितां ते चौघांत बोलण्या सारिखे नाहींत.

**मदनमंजिरी**—( दासीस व शिष्यास ) तुम्ही बाहेर चला व कोणीही आल्यास आंत सोडूनका.

**वासंतिका व शिष्य**—आज्ञा ( असें म्हणून बाहेर जातात. )

मदनमंजिरी—कां पंत आतां तर कांहीं चिंता नाहींना? सांगा आतां काय ते.

सुविचार—बाईसाहेब, मी जें बोलणार तें कांहींसें अधिक प्रसंगाबाहेरसें आपणास प्रथम वाटेल, परंतु, विचारा अंतीं त्याचें महत्व कळणार आहे. या करितां आपणास विलक्षण जें चातुर्य परमेश्वरानें दिलें आहे, त्याचा उपयोग या कामीं नीट झाला पाहिजे. व पायरी सोडून बोललों याची क्षमा ही झाली पाहिजे.

मदनमंजिरी— सुवाल बोला हो. पंत, तुमचे विचार तुमच्या नांवाला शोभणारे आहेत, हें मी जाणतें.

सुविचार—ऐकावें तर:-महाराज, राजाधिराजाचें पुनर्जीवन किती चमत्कारानें झालें, व त्यांच्या स्वभावांत काय विलक्षण पालट झाला, इत्यादि गुह्य गोष्टींतील बीज काय असावें, या विषयीं बाईसाहेबांनीं आज पर्यंत कांहीं तरी विचार केला आहे काय?

मदनमंजिरी—( हांसून ) शाबास शाबास, प्रधानजी तुम्ही चतुर खरे; अहो काय सांगूं! ज्या ज्या वेळीं मी एकटी असतें त्या त्या वेळीं माझ्या मनांत हेच विचार असतात. परंतु त्यांतील बीज काय असावें! हें कांहीं कळत नाहीं; आणि तुम्ही म्हणतां त्या प्रमाणें, पदोपदीं पहिल्या स्वभावांत व हल्लींच्या वागणुकींत मोठेंच अंतर दिसतें. यास दुसरें प्रमाण नको, कोणचाही एक ग्रंथ केला आहेना? त्याची तारीफ मोठ मोठे पंडितही करिताहेत, तेंच त्या म्हणजे झालें. त्यावरून पहिली विद्वत्ता व आतांची विद्वत्ता ह्यांमध्यें केवढें अंतर आहे, हें सहज कळेल.

**सुविचार**—योग्य प्रमाण बाईसाहेबांनीं काढिलें हें. इच्छीं जो अमरक नांवाचा ग्रंथ केला आहे, त्यांत सर्व शृंगारशास्त्र व अलंकार शास्त्र हीं भरून टाकिलीं आहेत, असें, बीद्यामुकुट नांवाचे जे आपल्या पदरचे मोठे पंडित, ते म्हणत होते. व पुनर्जीवनाच्या पूर्वीं, महाराजांशीं बोलतांना एखादा जर संस्कृत शब्द आला, तर त्याचा अर्थ विचारीत असत. तस्मात् एवढें हें ज्ञान एकदम कसें प्राप्त झालें असावें !

**मदनमंजरी**—( लाजून ) असाच किती गोष्टी तुम्हाला सांगूं ! सर्व प्रकारांनी मला मोठाच चमत्कार वाटतो. पण माझी कांहीं बुद्धी त्यांत चालत नाहीं. तुमचा याबद्दल काय तर्क झाला आहे ! तो तरी कळावा.

**सुविचार**—बाईसाहेब, मी वाचित सांगतों:— कोण्या योग्यानें राजयोग साधण्या करितां, या राजकलेवरांत प्रवेश केला आहे;

**मदनमंजरी**—( घाबरून ] प्रधानजी, हें जर खरें असेल तर मला फारच भीती वाटते. कारण, त्या योग्यानें आह्मास भ्रष्ट केलें; असें होत नाहीं काय !

**सुविचार**—( हसून ] छे, छे, सरकार काय ही शंका ? लौकिकांतील ही सर्व नातीं देहाला अनुसरून आहेत, जिवाला अनुलक्षून नाहींत, कारण हे विकार जिवाचे ठायीं मुळींच संभवत नाहींत, म्हणून ज्या देहाशीं, आपल्या देहाचा संबंध स्त्री व पती असा आहे तो असाच आहे. फक्त जीव मात्र बदलला, म्हणून आपणास दूषण मुळींच नाहीं.

**मदनमंजरी**—त्यांतील मतब असें आहे काय ! हें ऐकून मनाला फारच समाधान झालें. पण प्रधानजी, हेच यजमान चिरकाल असतील या विषयीं कांहीं उपाय आहे काय !

सुविचार—बाईसाहेब त्या बद्दल सर्व तयारी करून ठेऊन, आपलें अनुमोदन घेण्यास आलों आहें. तें काय म्हणाल तर

ऐकावें:—सर्व पुरूषांवर दूत पाठवून जीं जीं प्रेतें म्हणून असतील, तीं, तीं, सर्व जाळून टाकवितों; म्हणजे अर्थातच या योगीराजाचेंही प्रेत जळून जाइल, आणि हेच आम्हास चिरकाल येथेंच राहतील.

मदनमंजिरी—फारचांगली युक्तीही. जा लवकर त्या कामास लागा. त्या दुतांनीं मात्र फार बारकाईनें शोध करून, सर्व प्रेतें जाळून टाकावित. अशी चांगली त्यास ताकीद करा समजलात.

सुविचार—त्या विषयीं सरकारांनीं मुळींच काळजी करूंनये. आम्हां मी निरोप घेतों.

मदनमंजिरी—चला. प्रधानजी, तुमचे मात्र उपकार मी कधींही विसरणार नाहीं ( पडद्याकडे पाहून ) कोण आहेरे तिकडे !

वासंतिका—( पळत येऊन ) बाईसाहेब, काय आज्ञा आहे ?

मदनमंजिरी—दासी, प्रधान आलाहेत, त्यांस रात्री महालांतील शिपायांपासून प्रतिबंध होऊंनये, म्हणून तूं बरोबर जाऊन त्यांस पोहोंचवून ये.

वासंतिका—आज्ञा. ( प्रधानास ) चलावें दिवाणजी.

( असें झाल्यावर प्रधान नमस्कार करून वासंतिके बरोबर जातो. व पुनः वासंतिका प्रवेश करेत. )

मदनमंजिरी—( दासी आलीसें पाहून ) दासे वासंतिके.

कांहीं वेळ पुजेंत व कांहीं, प्रधानासह भाषणांत घालविला. परंतु आतां मात्र माझ्यानें महाराजांस पाहिल्यावांचुन राहवत नाहीं तर काय करूं !

**वासंतिका**—बाईसाहेब, मघा आपण " पुनः सरकाराची भेट घेणार नाहीं, " असा निश्चय केला होता, तो पाण्यावर लिहिलेल्या अक्षराप्रमाणें क्षणभंगुर झाला की काय ?

**मदनमंजीरी**—सखे, मत्स्यानें उदकाचा त्याग करण्याचें मनांत आणिलें तर जीवाचाही त्याग करण्यास तयार झालें पाहिजे या करितां सांगते, कसेंही करून, त्या शृंगारपयोनिधीशीं ह्या चंद्रनदीचा संगम करीव. तरच परिणाम

**वासंतिका**—बाईसाहेब इतके आपण घाबरू नका. मी प्रधानास पोंहोचविण्यास गेलें त्या वेळीं महाराज कोठें आहेत हा शोध घेतला. तेव्हां कळलें की सरकार भजनास बसले आहेत, यावरून मी खचित सांगतें, भोजन होतांच सरकार तांबुल घेण्यास, आपल्याच रंग महालांत येतील. म्हणून आपणही भोजन करून तयार असावें.

**मदनमंजीरी**—पण आजच्या स्वयंपाकाची तयारी आहे काय ? शोध घेऊन ये.

**वासंतिका**—मी येतांना तिकडूनच आलें सर्व तयारी आहे आपण चलावें.

**मदनमंजीरी**—चल तर. ( असें म्हणून दोघी बाहेर निघून जाती.

## प्रवेश ४.

### स्थळ—अमरकराजाच्या नगरा बाहेरील प्रदेश.

( तदनंतर पद्मपाद, हस्तामल, त्रोटक, आदिकरून आ-चार्यांशिष्य, नारायण नारायण करीत प्रवेश करितात.)

हस्तामल—अहो पद्मपाद आचार्यांनीं केलेली मासाची अ-वधि पूर्ण झाली तरी त्यांचें आगमन होईना म्हणून कांहीं शिष्यास या पर्वत गुहेंत आचार्यांच्या कलेवराचें संरक्षण करण्याकरितां ठेवून, आम्ही त्यांचा शोध करण्याकरितां कितीएक दिवस हिंडत आहों. पण अद्यापी कांहीं सुगावा लागत नाहीं यास काय करावें ?

पद्मपाद—ज्यावेळीं आचार्यांनीं " परकाया प्रवेश करण्यास जातों " असें सांगितलें. त्या वेळीं अमरुक्याचें शरीरांत प्रवेश करितो असें त्यांनीं स्पष्ट सांगितलेंसें मला पक्कें स्मरतें; पण आतां तें नांव ध्यानांतच येईना. यामुळें हा प्रयास भोगण्याचा प्रसंग पडलें आहे.

त्रोटक—अहो सहस्त्ररश्मी, अंधःकाराच्या पटलानें आ-च्छादित होईल काय ? उत्तम कस्तुरी, पटांत बांधून ठेविली म्हणून तिचा सुवास लपेल काय ? तद्वत सकलविद्यानिधी आ-चार्य कोठें असलेतरी, अलौकिक सामर्थ्यास्तव उद्भास आल्या वांचून राहणार नाहींत. म्हणून तुम्ही, चिंता करूं नका. थोडक्या दिवसांत त्यांचा शोध लागेल.

हस्तामल—आम्ही या अमरुक राजाच्या नगरी समीप आलों आहों, तर येथें गुप्तरूपें शोध चालविला पाहिजे.

**पद्मपाद**—हो हो त्या करितांच मी चिदाभासांस धारकाइनें शोध करण्या करितां नगरांत पाठविलें आहे. तों पर्यंत या उपवनांत बसून वाट पाहूं. तो आतां येईल.

( इतक्यांत नारायण नारायण करीत चिदाभासाचार्य प्रवेश करितात.

**हस्तामलक**—( त्यास पाहून ) हे चिदाभास आले. आतां काय सांगतात पाहूंया.

**पद्मपाद**—( चिदाभासास ) कसें कायहो ! आशा किंवा निराशा ?

**चिदाभासाचार्य**—मित्रहो, निराशेचें नांवच घेऊंनका. ज्या करितां आम्ही हिंडतों, तें आमचें विश्रांतिस्थळ येथेंच आहे.

**पद्मपाद**—( मोठ्या उल्हासानें ) कशावरून पण तुम्ही हें जाणिलेंत ! तें सांगा.

**चिदाभासाचार्य**—माझें एकंदर वर्तमान सांगतों ऐका; म्हणजे तुमची खात्री होईल. तुम्ही सांगितल्या प्रमाणें मी अन्यवेष घेऊन नगरींतील सर्व लोकांच्या गृहीं फिरलों. त्या वेळीं कोठें कोठें अमरकराजाचें चरित्र माझ्या कानीं आलें. परंतु, आम्हांस ज्या कारणीक गोष्टी, त्या कांहीं कानावर आल्यानाहींत. ज्यांच्या त्यांच्या भाषणांत, राजाच्या वक्तृत्वाची प्रशंसा, त्याच्या चातुर्याची तारिफ, त्याच्या शूरत्वाची वाहवा, त्याच्या विद्वत्तेची सीमा, त्याच्या औदार्याचा कळकळाट, हेच विषय असून, सर्व प्रजा त्यास अनुकूल असावी, असें मीं ताडिलें. परंतु, मला जे पाहिजे होतें तें कांहीं कोठेंच निघालें नाहीं.

**पद्मपाद**—बरं मग ?

**चिदाभास**—नंतर, गुप्तवेषानें त्या राजाच्या राणीमहालों-

न गेलों. त्या ठिकाणीं, कायसांगू विलक्षण शोभा जी पाहि- ली, तिचें वर्णनच करितायेतनाहीं. त्या राजाच्या ज्या सुंदर स्त्रिया त्या सर्वही स्वरूपानीं देवांगनेसही लाजीवणाऱ्या; मी प्रत्येकीच्या महालांत गेलों तेव्हां जी ती यजमान केव्हांयेती- ल, आणि आपणास केव्हां संतुष्ट करितील, हाच निजध्यास धरून बसलेली मला दिसली. तसेंच त्या सर्व स्त्रिया, आपाप- ल्या दासींना, यजमानास आनंद देणाऱ्या उपभोग द्रव्यां- ची तयारी करण्यास सांगत होत्या. त्या वरून, हा राजा जसा लोकप्रिय, तसाच मोठा उपभोगी, कामशास्त्रांत निष्णात असावा, असा माझा सिद्धांत झाला. परंतु, मला व्हावा तसा आनंद झाला नाहीं. कारण माझ्या तृषित कर्णांस जें भाषणा- मृत पाहिजे होतें, तें मिळालेंच नाहीं.

पद्मपाद--नंतर काय केलेंत ?

विद्याभासाचार्य--तेथून मग मी नदीतीरीं गेलों. तेथें कोण स्नान करिताहेत, व कोण संकल्प सांगताहेत, कोण आसनें घा- लून संध्यादि आन्हिकें सारिताहेत, कितीएक सुवासिनी आंग धुऊन वस्त्रें परिधान करिताहेत, कांहीं जलकुंभ शिरावर घेऊन प्रपंचांतील सुखदुःखाच्या गोष्टी एकमेकांस सांगत चालल्या आ- हेत, असें मी पाहिलें, परंतु त्या ठिकाणींही माझी इच्छा पुर्ण होईलसें दिसलें, नाहीं. मग मी तसाच, पाणोठा सोडून वरवर चाललों, तों नदीवरील दाटी कमी कमीशीं माझ्या दृष्टीस पडली. त्या ठिकाणीं एक तरुण स्त्री, व एक तरुण पुरुष असे उभयतां मिळून कांहीं बोलत होते. तें पाहून मी जवळ गेलों आणि त्यांचीं भाषणें ऐकूं लागलों.

पद्मपाद--मग काय झालें ?

विद्याभासाचार्य--ऐकावें. तो पुरुष जो बोलत होता

तो पुरुष भीत भीत भाषण करीत होता. व त्याच्या भाषणाच्या संबंधें करून तो राजाचा अपराधी असावा असें मला समजलें. आणि ती स्त्रीही त्याची भाषणांत स्पष्ट मला कळून आलें. वि-घळो, आतां तुम्हांस फार वेळ संशयांत पाडीत नाहीं. माझ्या कर्णचकोरांस त्यांचीच भाषणें चंद्राचित झालीं.

पद्मपाद—( उत्कंठेनें ) सांगा, सांगा. ती सत्वर सांगा.

चिद्विलासाचार्य—ती स्त्री म्हणते. " जिवलगा आतां पुरे हा तुमचा अज्ञातवास. मी किती दिवस तरी ह्या वियोगाग्नी सहन करावा ! " त्यावर तो पुरुष म्हणाला. " हे प्राणप्रीते, विरहाग्नी ची पीडा तुलाच होते आणि मला होत नाहीं, असें तूं समजतेस काय ! पण करूं काय ! मजवर अमरकराजाची गैरमर्जी झाली आहे. त्यास मी नगरींत आल्याचें कळतांच तो माझें शासन के-ल्यावांचून राहणार नाहीं. याकरितां माझे ठाउके, जसे आजप-र्यंत दिवस घालविलेस तसें आणखीहि कांहीं घालीव. "

पद्मपाद—( मध्येंच ) त्यावर ती स्त्री काय म्हणाली ?

चिद्विलासाचार्य—हो ऐकत धीर धरा. नंतर ती स्त्री म्हणाले " हे सकुमारा, आतां तुम्हांस भीती मुळींच [illegible] कारण तो राजा मृत झाला. व हल्लीं जो राजा झाला आहे तो मोठा साधु, परम नीतिमान, मोठा दयाळु, असा कोणी योगी आहे. " त्यावर तो पुरुष अधिक [illegible] बोलला. " हे प्रिये, तूं हें काय म्हणतेस हें मला कळत नाहीं. कारण, एक दोन दिवसांपूर्वी त्या राजाचा मजवर राग होता तोच [illegible]. असें असून तूं मृत [illegible] असें [illegible] म्हणतेस

पद्मपाद—त्यावर ती स्त्री काय म्हणते पाहूं. पुढें सांग ?

चिद्विलासाचार्य—त्यावर ती स्त्री म्हणाले " जिवलगा सर्व

वर्तमान सांगतें ऐका:—तुह्मावर ज्या चा कोप झाला तो राजा कांहीं रोगस्थ होऊन मृत झाला. त्यावेळीं त्यांस स्मशानांत, पुढील विधी करण्याकरितां नेलें, असें असतां एकाएकीं तो जिवंत झाला. मग काय विचारावें सर्वत्रांस मोठेंच आश्चर्य झालें. सारांश तो राजा हल्लीं राज्य करतो आहे. व त्याच्या एकंदर गुणांशीं पहिले गुण ताडून पाहातां, कांहींच संबंध दिसत नाहीं. या करितां हा कोणीतरी योगी, राजयोग साधण्याकरितां आला असावा. असें त्याच्या चतुर प्रधानानें, व सर्व राजांगनां-नीं सिद्ध केलें आहे. तर मित्रा आतां घरीं खुशाल चलावें. ,, या वर तो पुरूष फार आनंद पावून, निज समावेत जाताझाला. कां मित्रहो, या वरून तुम्हांस सर्व समजलें कीं नाहीं? मी अगदीं निश्चयानें सांगतो, आमचे आचार्य येथेंच आहेत,

( त्या वेळीं सर्व शिष्य नारायण नामाचा गजर करितात. )

**पद्मपाद**—मित्रहो, आतां विलंब नको. आचार्यांस विषयां-च्या योगें, इकडील स्मृती उडाली आहे तर मी आतां गवई होऊन, त्या राजापाशीं जाऊन गाणें गातों. व त्या गायनांत, इकडील तत्वाचा उपदेश आणितों म्हणजे लागलेच स्मृतीवर येऊन, देहत्याग करून पूर्व कलेवरांत येतील.

**हस्तामल**—त्या वेळीं तुम्ही मात्र सावध असा कारण त्यांस स्मृती पोहोंचतांच ते देहत्याग करितील, व प्रधान आदिककरून, तुम्हांस धरून भलतेंच करितील,

**पद्मपाद**—छे, छे. त्याची तुम्ही किमपि भीती बाळगुं नका त्यांस क्षण पोहोंचतांच, मी योगबळें नाहींसा होऊन तुम्हीं आहांत तेथेंच येतों. आतां तुम्हीं सर्व त्या गुहेंत चला. फक्त चिदाभास मात्र मज समीप असूंद्यां. कारण, त्यास नगरींतील सर्व माहिती आहे. चला तर सर्व. मीही चिदाभासासह आतां नगरींत जातों,

( असें झाल्यावर सर्व नारायण, नारायण, करीत निघून जातात. )

---

## प्रवेश. ९

### ( स्थळ—मदनमंजिरीचा रंगमहाल. )

( तदनंतर वासंतिकेसह मदनमंजिरी प्रवेश करिते. )

**मदनमंजिरी**—अग वासंतिके, मी तर भोजन करून या महालांत येऊन बसलें. पण महाराज इकडेच आले तर बरें, नाहीं पेक्षां सर्व व्यर्थ होईल. बरें तिकडील भोजन झालें असेल काय !

**वासंतिका**—हो. सरकार भोजन करून मघाच उठले. आतां इकडेच येतील यांत कांहीं संशय नाहीं. पण यजमान आल्यावर, आपला कसा काय वागण्याचा बेत आहे ?

**मदनमंजिरी**—शाबास ठीक प्रश्न केलास. अगोदर तेंच ठरविलें पाहिजे. सखे, जरी महाराज, मजशीं प्रतारणा करून, काल रात्रीं, सवतीच्या मंदिरांत गेले, तरी त्यांच्या मजवरील प्रीतींत किमपि अंतर व्हावयाचें नाहीं; हें मी निश्चयानें सांगतें. तेव्हां स्वारी येतांच, त्यांच्याशीं प्रतिकूलता न दाखवितां, स्वाधीन व्हावें हेंच चांगलें नव्हे काय !

**वासंतिका**—आपण म्हणता तें खरें. परंतु, कांहींबळ आर्जव करून घेतल्या शिवाय एकदम स्वाधीन झालें असतां, सातदिवसांचा उपोषित असल्यामुळें, मान अपमान एकीकडे ठेवून, अ-

न्यावर एकदम झडप घालणाऱ्या तेलंग्याच्या कृतीप्रमाणें आपली कृती दिसणार आहे. आणि तशांतून प्रथम दर्शनीं स्त्रिपुरुषांचा कांहीं वक्रभाव असल्या वांचून, कंदर्पनाटकास याचा तसा रंग येणार नाहीं. याकरितां सांगतें यावर मग आपली मर्जी.

मदनमंजिरी—( हंसून ) दासी, या मदनमंजिरीला, तूंच दासी योग्य आहेस. बरें तुझ्या मर्जी प्रमाणेंच होऊंदे. पण उपभोग द्रव्यें, तांबूल, अंगराग, इत्यादि सर्व तयारी आहेना ?

वासंतिका—बाईसाहेब त्या तयारीत या मंदिरांत कांहीं कमी असल्यावर, त्यास विलासमंदिर हें नांव शोभतेंचना. आपण कांहीं काळजी करूंनये, नित्यापेक्षां विशेष तयारी करून ठेविली आहे.

( इतक्यांत पडद्यांत शब्द होतो. )

श्लोक

[ ॥ आलोलामलकावलीं विलुलितां बिभ्रच्चलत्कुंडलं ]

[ ॥ किंचिन्मृष्टविशेषकं तनुतरैस्वेदांभसां जालकैः ॥ ]

[ ॥ तन्व्या यत्सुरतांततांतनयनं वक्त्रं रतिव्यत्यये ॥ ]

[ ॥ तत्त्वा पातु चिराय किं हरिहरब्रह्मादिभिर्दैवतैः ॥ ]

मदनमंजिरी—सखे वासंतिके, ऐकलासका श्लोक ? आहाहा किती मधुर वाणी बरें ? सखे पंचांसन्याच्या मुखांतून मंत्र निघतांच जसा विषाचा संचार होतो, तसून प्राणनाथांनीं स्फट-

लेला श्लोक ऐकतांच माझ्या अंगांत मदनसंचार होऊन आं-
गांतील कंचुकीचे शतशः तुकडे झाले.

वासंतिका--बाईसाहेब, काय हें ? अद्यापीं देखील नाहीं तों
इतकें; मग ती मदनमनोहर मुर्ती दृष्टी पडल्यांवर, आपल्याच्यानें
मला दिलेलें वचन, कसें पूर्ण करवेल ! ती पाहा स्वारी जवळ
आली. हे सरकारास मंदिरांत पोहोंचवून सर्व सेवक माघारे गेले
आतां मी सांगतें असें करा. यामंचकावर, गालास हात लावून
खालीं दृष्टि देऊन स्वस्थ बसा. सरकारांनीं कितीही इलाज केले
तरी वर पाहूं नका. व मीही आपल्या मागें स्वस्थ खांबाप्रमाणे
उभी राहातें. आणि मी ज्या वेळेस खूण करीन तेंव्हांच सरका-
रांच्या स्वाधीन व्हा ह्मणजे मोठी मौज होईल.

मदनमंजिरी—बरें आहे, तुझ्या इच्छेप्रमाणेंच करितें (असें
म्हणून दासीनें सांगितल्याप्रमाणें बसते. व दासी मागच्या बा-
जूस उभी राहते.)

(तदनंतर अमरक राजा प्रवेश करितो.)

राजा--(पूर्वोक्त श्लोक पुनः ह्मणून) भगवन कंदर्प,
सर्गस्थिति निरोध करणारे जे ब्रम्हाविष्णुमहेश तेही तवाज्ञा उ-
ल्लंघन करण्यास समर्थ नाहींत; मग प्राकृत जनांची कथा काय !
भो मकरध्वज, रतिमध्याच्या ठायीं, मदमस्त स्त्रियेच्या समस्त
शरीरांत तुझें वास्तव्य ज्या कालीं असतें, त्याकालीं त्या कामिनी-
ज्या मुखाचें माहात्म्य काय वर्णन करावें ! निर्लज्यपणें क्रीडेस
सज्य झाली असल्यामुळें, समस्त केश अस्ताव्यस्त झालेले, संपूर्ण
इच्छा परिपूर्ण होणार यास्तव आनंदानें मान डोलवितांना
कर्णांतील मौक्तिक भूषणें दोलायमान झालेली, पतीशरीराला
नीरखीवन् आलिंगन दिल्या कारणानें, उत्पन्न झालेल्या धर्मबिं-

दूर्नी, ललाटावरील कुंकुमतिलक किंचित पुसटलेला, सुरतसौख्य पूर्ण अनुभविण्याकरितां, तदाकार होऊन विशालनेत्र किंचित मिटलेले; इत्यादि लक्षणांनीं युक्त तें मुख विधिहरिहरांही अशक्य जें कृत्य तें करण्यास समर्थ. आहे. तस्मात् सौख्येच्छु जनांनीं तसल्या मुखाचीच उपासना करावी.

**मदनमंजिरी**—सखे वासंतिके, चंद्रोदय झाला असतां कुमुदिनीनें विकास पावूनये म्हणून किती जरी प्रयत्न केला तरी तिचा तो व्यर्थ होतो. तद्वत मला होऊं लागले आहे.तर दासी, चंदन वृक्षाला नवमालतिची वेल जशी वेष्टीते. त्या प्रमाणें पतीशरीरास घट्ट आलिंगन देऊं काय ?

**वासंतिका**—बाईसाहेब अंमळ थांबा उतावेळपणानें सर्वच बिघडेल. सोंग मोठ्या शांततेचें आणून अधीरपणाची बतावणी शोभत नाहीं.

**राजा**— ( दोन पावलें चालून राणीच्या सन्मुख होऊन ) हो हो. काय चमत्कार हा ! ( मग आपल्याशींच उत्प्रेक्षेनें ) अरे- हा काय षोडशकलांनीं युक्त असा पूर्ण शरच्चंद्र आहे ? किंवा मंदाकिनींतील परम देदीप्यमान असें सुवर्ण कमल आहे ? किंवा स्वच्छ बिलोरी तावदान आहे ? ( विचार करून ) छे; छ; माझ्या प्राणदायितेचें मुख असावें. अरे ही दोन मोठीं काय नील कमलें आहेन ? किंवा स्वच्छंद तळपणारे दोन मत्स्य आहेत ? किंवा कामिकुरंगास निर्भेषित करणारे मदनबाण आहेत ? ( विचार करून ) नाहीं, नाहीं, तें माझ्या सुहास्यवदनीचें नेत्र असतील ( नीट निरखून पाहून ) अरे हे दोन चक्रवाकपक्षी आहेत ? किंवा मालती पुष्पाचें गुच्छ आहेत ! किंवासुवर्ण कलश आहेत ? ( विचार करून ) काय ही शंका ! ते माझ्या मंजुभाषणीचें

कुच असतील ( पुनः उत्प्रेक्षेनें ) अरे, नेत्रास दिपविणारी ही काय विद्युलता आहे ? किंवा आकाशापासून पतन पावणारें नक्षत्र आहे ? किंवा सुवर्णाची वेळी आहे ? ( विचार करून ) अरेरे केवढा मला भ्रम झाला पहा. ही तर माझी हरिणाक्षी मदनमंजिरी होय.

( असें ह्मणून आलिंगन देण्याकरितां तिच्या शेजारीं मंचकावर जाऊन बसतो. तोंच मदनमंजिरी, चटकन उठून दूर जाऊन उभी रहाते. )

**मदनमंजिरी**—( दासीकडे तोंड करून ) कागे दासी, वाग्दोष हा पंडितांच्याही भाषणांत सहज होतो. कशावरून ह्मणशील तर ऐक:- प्राणनाथांनीं सर्व वर्णन यथास्थीत केलें. परंतु शेवटीं " पट्टराणी शृंगारचंद्रिका " असें म्हणावयाचें तें चुकून ह्या दुर्दैवी मदनमंजिरीचें नांव घेतलें. कारण तशा वर्णनास तीच वृद्धा योग्य आहे.

**राजा**—( मनांत ) आज हें मजशीं विपरीत आचरण, व वक्र भाषण कां बरें ! समजलों. काल मी त्या भयंकर संकटांत सांपडल्याचें फळ हें. असो. सर्व स्त्रियांत हिची माझ्या ठायीं निःसीम प्रीती आहे. तेव्हां कोप फारवेळ रहाणार नाहीं, थोडेसें मनोवेधक भाषण केलें म्हणजे पुरे आहे. ( उघड ) सखे शशिमुखी मदनमंजिरी, काल रात्रीं मी तुला फारच दुःख दिलें यांत कांहीं संशय नाहीं. परंतु, त्या बद्दल तूं सूज्ञ असून मला दोष देऊंनयेस. कारण, काल मी तुझ्या आलिंगनसुखास कसा मुकलों, हें तुझ्या परम चतुर वासंतिकेनें तुला सांगितलेंच असेल.

**मदनमंजिरी**—( वासंतिकेकडे पाहून ) दासी आतां तूंच उत्तर दिलें पाहिजे.

**वासंतिका**—सरकार कालची दशा काय सांगावी ! वेळ चां गली होती, आणि मी आपण तेथें कसे सांपडला याबद्दल सर्व वर्तमान मला कळलेलें सांगितलें, म्हणूनच बाईसाहेबांचा राग शांत झाला. नाहींपेक्षां भलतेंच होतें.

**राजा**—( उठून मदनमंजिरीचा हात धरून ) झालें तर मग आतां कां राग ! वास्तवीक वर्तमान तुला कळल्यानंतर मी निर्दोषी आहे, अशी तुझी खात्री झाल्यावांचून राहिली नसेल. तर आतां मंचकावर चल उगीच उभे राहून या सकुमार चरणास किमर्थ श्रमवितेस ?

[ असें म्हणून बलात्कारानें तिला आणून मंचकावर आपल्या शेजारीं बसवून घेतो. )

**वासंतिका**—आतां माझे नेत्र संतुष्ट झाले.

**मदनमंजिरी**—( रागावलेसें करून ) चावटपणाचें बोलणें मला नाहीं आवडावयाचें हो सांगतें जा येथून निघून द्वाड मेली.

**वासंतिका**--आज्ञा. मी असें बोललें म्हणूनच मला लवकर घालवून देण्यास चांगलें निमित्त झालें. ( असें म्हणून हंसत निघून जाते. ]

**राजा**--प्रिये, मोठ्या चातुर्यानें सांप्रत एकांत केलास येणें करून मला फार संतोष झाला' पण अद्यापी मनांतील सर्व राग नाहींसा करून, शृंगार शास्त्रांत सांगितलेली जी आठ प्रकारची आलिंगनें त्यांतील तुला परम प्रिय जें तिलतंडुलालिंगन, तें प्रसन्नमनें कां देत नाहींस ?

**मदनमंजिरी**--आपल्या कामा पुरती लाडीगोडी करण्याची

चाल, पुरुषांना स्वाभाविक आहे; हें मी पक्कें जाणतें; तसेंच अ-
तिप्रेमाचा शेवट दुःखरूप आहे. असा मला काल रात्रीं चांगला
अनुभव आला आहे. ह्मणून सांगतें, आपण आज पासून सु-
शाळ कालच्या प्रमाणें वर्तणूक करावी त्याबद्दल मला ति-
ळमात्र राग नाहीं.

**राजा**—हे प्रिय मंजुभाषिणी, पुरुष कितीही विषयी असला
तथापी त्याचें खरें प्रेम सर्व ठिकाणीं नसतें. आणि ज्या एखाद्या
ठिकाणीं असतें, तेथें अशा प्रकारचा एकदम फेरफार दिसला
ह्मणजे त्याच्या जीवनाची मुळींच आशा नको आहे. तर हे वि
लासिनी, ह्या अमरकाच्या अंतःकरणाची तुला पूर्ण परिक्षा झा
ली नाहीं, ह्मणूनच तुझ्या मुखांतून अशी निष्ठुर अक्षरें निघता
हेत. सखि, तुला सत्य सांगतों, अशा प्रकारें वागण्याचा तुझा
निश्चय जर खराच झाला आहे तर माझ्या जीवाची आशाच
सोडूनदे.

**मदनमंजिरी**—( अमळ घाबरलेसें करून ) महाराज अ-
शी दुष्ट अक्षरें उच्चारूं नयेत. पण खरेंच सांगा काल रात्रीं आ
पणास माझा कंटाळा येण्याचें काय कारण झालें तें ?

**राजा**—प्रिये, आतां खरें सांगतों:- स्त्रियांच्या, पद्मिनी-
चित्रिणी शंखिणी आणि हास्तिनी अशा चार जाती आहेत;
त्यांतून सर्वात श्रेष्ट जी पद्मिनी त्या जातीची तूं आहेस; हें मी
जाणिलें आहे. आणि त्या पद्मिनी स्त्रियेला रात्रीच्या वेळीं भोगे-
च्छा मुळींच नसते. कारण पद्म हें सूर्योदया पासून सूर्यास्ताप-
र्यंतच विकसित असतें. ह्मणून मी रात्र तिकडे घालवून, तुला
संतुष्ट करण्याकरितां आतां इकडे आलों आहें; समजलीस ?

**मदनमंजिरी**—( किंचित गालातल्या गालांत हंसून ]

पुरे पुरे जळली चेष्टा. हें ज्ञान काल पासूनच झालें वाटतें. म-लाही तें कामशास्त्र आपल्या सहवासानें थोडेसें कळतें. देऊं कां याजवर समर्पक उत्तर !

**राजा**— [ उद्गारानें ] दे. दे. या तृषित कर्णचातकास तुझा वाङ्मयच अतिप्रिय आहे.

**मदनमंजरी**—प्राणप्रिया, पद्मास सूर्य दिसला म्हणजे तें विकसित होतें, मग तो केव्हांहीं दिसो. तद्वत् मला आपण सूर्य-स्थानीं अहां ह्मणून आपण ज्या ज्या वेळीं ह्या स्त्रियेच्या सन्निध असाल त्यावेळीं त्या माझें हृत्पद्म विकसित झाल्या वांचून राहणार नाहीं.

**राजा**--शाबास शाबास- वात्स्यायन ऋषींनी शृंगारशास्त्र केलें पण तुझी कल्पना त्यांच्याहीपेक्षां जास्त आहे. एकूण मदन-मंजिरी ह्या नावास तूंच योग्य आहेस.

( असें म्हणून तिच्या हनुवटीस हात लावून आपलें मुख पुढें करितो. ]

**मदनमंजिरी**--( राजाचा हात एकीकडे करून ) माहाराज बलात्कारें आपला हेतू सिद्ध करण्यांत सौख्य नाहीं हें काय तें ? अंमळ धीर धरावा.

**राजा**—प्रिये काय सांगुं ! त्यांतच सौख्य आहे. कसें जर म्हणशील तर एक;—

॥ संदष्टाधरपल्लवा सचकितं हस्ताग्रमाधुन्वती ॥
॥ मामामुंच शठेति कोपवचनैरानर्तिता भ्रूलता ॥
॥ सीत्कारांचितलोचना सपुलकं यैश्चुंबिता मानिनी ॥
॥ प्राप्तं तैरमृतं श्रमाय मथितो मूढैः सुरैः सागरः ॥

सखे, चुंबनकाळीं अधर पल्लवाला दंश केला असतां चकीत होऊन हातानें झिडकारणारी, " अरे हे शठा मला सोड "अशा कोप युक्त भाषणाच्यायोगें भ्रलता वक्र करणारी, किंचित डोळे मिटून सीत्कार करणारी, अशा स्त्रियेला सरोमांच ज्या पुरुषांनीं चुंबन केले त्यांसच खरें अमृत मिळालें. मुखं देवांनीं समुद्रमंथन करून केवळ श्रमच मिळविला. त्यांस खरें अमृत मिळालें नाहीं.

**मदनमंजिरी**—प्राणप्रिया, अशा चातुर्यनिधी पुरुषावर कोणती अधम स्त्री असंतुष्ट राहील ? महाराज, मी इतक्या वेळ माजेनें विपरीत आचरण केलें. त्याची क्षमा करावी. ( असें म्हणून राजास आलिंगन देते. )

( इतक्यांत पडद्यांत शब्द होतो —" अगे वासंतिके, राजाधिराज माहाराजांची स्वारी येथें असल्यास, जाऊन कळीव कीं आमात्य सुविचार भेटीकरितां आले आहेत. " )

**राजा**—प्रिये आमचा परम चतुर प्रधान येथें येणार आहे, असें वाटतें, मर्यादेनें बैस.

**मदनमंजिरी**— [ कपाळास आठी घालून ) काय बाई त्रास तरी ! [ असें म्हणून दूर बसते. ]

( नंतर वासंतिका प्रवेश करिते. )

**वासंतिका**— ( राजास ) महाराज, प्रधानजी आपली भेट घेण्याकरितां आले आहेत. जर आज्ञा होईल तर त्यांस आंत घेऊन येते.

**राजा**—जा सत्वर त्यांस घेऊन ये.

**वासंतिका**—आज्ञा. ( असें म्हणून आंत जाऊन प्रधानासह प्रवेश करून, प्रधानास म्हणते. ) दिवाणजी, चलावें. हे सरकार राणीसाहेबांसह बसले आहेत.

**सुविचार**—( जवळ येऊन ) महाराजांचा व राणीसरकारांचा जयजयकार असो. ( असें म्हणून नमस्कार करून उभा राहातो. )

**राजा**--अमात्य, मी इकडे आल्या कारणानें, कांहीं राजकार्यांत व्यत्यय आला कीं काय ?

**सुविचार**—सरकार, राजकार्यांत व्यत्यय येईल अशी आपण व्यवस्था ठेवलीच नाहीं. सर्व कृत्यें योग्य अधिकाऱ्याकडे संपवून देऊन, त्यावर गुप्त नजर आपली आहेच. यामुळें कोणत्याही गोष्टीचा दरबारांत बोभाट नाहीं. परंतु, कोणी दूर देशाहून एक गवई आला आहे. व आपल्या कसबांत तो अति सुगर असावा, असें त्याच्या भाषणावरून समजतें. आणि अशा लोकांची वर्दी ते येतांच आपणास द्यावी, अशी मला सक्त ताकीद असल्यामुळें मी सरकारास थोडीशी पीडा दिली, याबद्दल क्षमा असावी.

**राजा**—( संतोषानें ) कोण गवई आला आहे ? बरें, त्यास मोठ्या दिवाणखान्यांत घेऊन यावें, व आपल्या पदरच्या सर्व संगीतकारांस तेथेंच येण्याबद्दल आज्ञा करावी मीही तिकडेच येतों.

**सुविचार**—आज्ञेप्रमाणें सर्व तयारी ठेवण्याकरितां जातों [ असें म्हणून वंदन करून निघून जातो. )

**राजा**—वासंतिके, राणीमहालांत संचार करणाऱ्या वृद्ध वेत्रवतीस सांगावें कीं, थोरल्या दिवाणखान्यांत उत्तम गवयाचें गाणें आहे, तर सर्व राजांगनांनीं तेथें यावें, अशी माझी आज्ञा आहे.

**वासंतिका**--आज्ञा होतें त्या प्रमाणें वृद्धवेत्रवतीस सर- कारची आज्ञा कळवितें. ( असें म्हणून निघून जाते. ]

**राजा**--प्रिये, तुला गायन अति प्रिय आहे म्हणून इतक्या त्वरेनें हा बेत करविला, तर कशी काय मर्जी आहे ?

**मदनमंजिरी**--माझी इच्छा आपल्या विरुद्ध कधीही न- सते. ही मी तयार आहे.

**राजा**--चल तर थोरल्या दिवाणखान्यांत जाऊं ( असें झाल्यावर उभयतां चालूं लागतात. )

**मदनमंजिरी**--( अपशकून झालासें दाखवून ] महाराज, मी चालूं लागलें असतां एकाएकीं माझा उजवा नेत्र स्फुरण पावतो आहे. तेव्हां असें अनिष्ट सूचक चिन्ह या वेळीं कां झा- लें असेल बरें !

**राजा**--सखे, यांत भिण्यासारखें कांहीं नाहीं. तुला काल रात्रभर जागरण झालें आहे, या मुळें, असा विकार नेत्रास झाला असेल. तथापी कांहीं शांती करण्यास उपाध्यायास सांगतां येईल. चलावें. [ नंतर दोघेही निघून जातात. )

---

## प्रवेश ६

### ( स्थळ-- आचार्यांचें कलेवर ठेविलेली गुहा. )

[ तदनंतर आचार्यांचें कलेवर घेऊन हस्तामल त्रोटक आदि-

करून आचार्यशिष्य, नारायण, नारायण, असें म्हणत प्रवेश करितात. ]

**हस्तामल**—अहो त्रोटकाचार्य, आह्मीं पद्मपादाचार्यांत व चिदाभासाचार्यांस, अमरकराजाच्या नगरींत सोडून येथें आलों त्यास बरेंचदिवस झाले. परंतु, अद्यापी तिकडील वर्तमान काय हें समजत नाहीं. यास्तव मला मोठी चिंता लागली आहे.

**त्रोटक**—अहो आतां आगदीं काळजी नको. चिदाभासानीं नगरींत जाऊन वर्तमान आणिलेलें आह्मी ऐकिलेंच आहे. बहुतकरून आचार्यांस घेऊनच ते येतील असें वाटतें.

( इतक्यांत पडद्यांत नारायण असा शब्द होतो. ]

**हस्तामल**—[ आनंदानें ) खचित हा शब्द चिदाभासांचा आहे.

( तदनंतर नारायण, नारायण करीत चिदाभासाचार्य प्रवेश करितात. )

**चिदाभासाचार्य**— ( गडबडीनें ) मित्रहो, पद्मपाद अद्यापी येथें आले नाहींत काय ?

**त्रोटकाचार्य**—अहो तुम्हीं आणि ते मिळूनच होता, असें असून तुमची आणि त्यांची चुकामूक कशी झाली ? आह्मी इतका वेळ ह्याच काळजींत होतों. बरं पण आह्मीं तुम्हांस सोडिल्यावर तिकडे काय काय झालें ?

**चिदाभासाचार्य**—सांगतो ऐका:—तुह्मी इकडे आल्यावर, मी व पद्मपादाचार्य मिळून गवई होऊन, त्या राजाच्या प्रधानास जाऊन भेटलो. पद्मपाद हे मुख्य गवई झाले व मी त्यांचा शिष्य झालों. त्या प्रधानाची व आमची गांठ पडतांच मी आमच्या गुरुगवयाची फारच स्तुती केली आणि बोलण्यांत असें दर्शविलें

कीं, " आमच्या गुरुजीस द्रव्याची आशा मुळींच नाहीं. परंतु आपला गुण यथास्थित जो समजतो त्याज पुढेंच गायन करावयाचें. तेव्हां आम्हीं येथील राजा मोठा गुणग्राहक, व गायनादि प्रकारांचा मर्मज्ञ आहे, अशी वदंता ऐकिली, म्हणून मुद्दाम आलों आहों तर तुमच्या यजमानाच्या कानावर गोष्ट घालून आम्हांस काय तें कळवावें !

**हस्तामल**—मग पुढें काय झालें !

**चिदाभासाचार्य**—नंतर तो चतुर प्रधान, आमचा मोठा सन्मान करून, आम्हांस एक्या उत्तम स्थळीं उतरवून आमची सर्व तजवीज करण्याकरितां एका कारकुनास सांगून, राजाच्या कानावर गोष्ट घालण्याकरितां निघून गेला.

**हस्तामल**—बरें मग !

**चिदाभास**[illegible] आमच्या भोजनाची वगैरे चांगली तयारी केली. नंतर मी व आमचे गवईबोवा भोजन करून बसलों. तोंच प्रधानही गडबडीनें आला, व म्हणाला कीं, " राजाच्या मनांतून आतांच तुमचें गाणें ऐकणें आहे, तर मज बरोबर चलावें " त्या वेळीं आम्हीं तयार झालों. मीही लागलाच विणा स्कंधावर घेतला, आणि प्रधानाबरोबर, त्या राजाच्या राणीमहालांतील मोठ्या दिवाणखान्यांत जाऊन आम्हीं बसलों.

**हस्तामल**( मोठ्या उत्कंठेनें ) मग काय झालें !

**चिदाभास**—निव्वळ, तेथील शोभा पाहून माझे नेत्र दिपून गेले. तो महाल सर्व सुवर्णाचा असून, त्यावर बारीक काम हिरे, पाच, माणीक इत्यादि नवरत्नांचें केलें होतें. तो मोठा दिवाणखाना अष्टकोन असून, मध्यें रत्नजडीत शेंदर सुवर्णासनें वर्तुळाकार मांडलीं होतीं. व त्यांच्या मध्यें सर्वांहून उंच असें एक आ-

सम होतें. प्रधानानें अम्हांस त्या आसनां समोर नेऊनबसाबल. तोंच अनेक संगितकार येऊन, कोणीं सारंगी, कोणी सतार, कोणी बीन,कोणीं जलतरंग इत्यादि अनेक वाद्यें काढून त्या सर्वांचा एक सूर केला; आणि आम्हांस आमचा विणा त्या सुरा बरोबर मिळविण्यास त्यांनीं सांगितलें.

**हस्तामल**—मग कसें कलेंत?

**चिदाभासाचार्य**—तेव्हां मात्र माझी पांचावर धारण बसली कारण विणा अडवा खांद्यावर घ्यावा ह्या शिवाय मला विशेष कांहींच येत नव्हतें. आणि आमच्या गुरूजीस तरी विशेष येत असेल असेंही मला वाटलें नव्हतें. परंतु आमच्या गवई-बुवानीं मोठया गंभिरितेनें मजपासून विणा घेऊन, कांहीं खुंटया पिळून, व कांहीं मणी वर खालीं करून, सरासरी विणा जुळविला. तोंच त्या दिवाणखान्याच्या समोरिल दार एकदम उघडलें.

**हस्तामल** ( उत्सुकतेनें ) मग काय झालें बरें?

**चिदाभासाचार्य**—त्या द्वारांतुन एक हजार तरुण दासी, सर्वही रत्नाभरणांनीं ओथंबलेल्या, व एकसारखा पोशाग केलेल्या अशा येऊन तीं जीं शंभर आसनें होतीं त्या सभोवतीं उभ्या राहिल्या.

**हस्तामल**—नंतर काय झालें!

**चिदाभासाचार्य**—नंतर त्या मागून वसंत ऋतुंत उन्मत्त क रिणीसह कुंजराधिप जसा सरोवरांत प्रवेश करतो, तद्वत् तो राजा आपल्या शंभरही स्त्रियांसहवर्तमान आला व सर्वांत उंच जें आसन त्यावर बसला. नंतर शंभरही स्त्रिया, त्या आसना भोंवतीं जीं शंभर आसनें होतीं त्यावर अनुक्रमें बसल्या. तोंच, जिनें पायापर्यंत कलाबतुचा झगा घातला आहे, व हातात

सुवर्णयष्टी घेतली आहे, अशा वृद्धवेत्रवतीनें आमच्या गुरुजीस गाण्यास आरंभ करा, अशी खूण केली.

**हस्तामल**—बरें पुढें मग!

**चिदाभासाचार्य**—त्या वेळी मात्र मी घाबरलों. कारण आमच्या गुरुजीस गाण्यास चांगलें येते हें मला ठाऊक नव्हतें. त्या वेळीं मीं, पळून जाण्यास कोणची वाट सोईची आहे हें पाहूं लागलों. परंतु पद्मपाद गवईबुवानीं विणा घेऊन फारचउत्तम गायन केलें, व गायनाच्या ऐन भरांत एक प्रबंध म्हटला; ज्यातील अर्थ भ्रमराच्या रूपकाचा असुन, " तुम्हीं कोण, तुमचें कर्तव्य काय! तुम्हीं ज्यास आशा लावून इकडे आला तें तुमच्या वियोगानें मरावयास टेकलें आहेत." इत्यादि होता. तो प्रबंध पद्मपादानीं शेवटास नेतांच, राजाला खूण पोहोंचलि, व लागलेंच डोळे पांढरे करून त्या थोरल्या सिंहासनावरून धाडकरून राजाधिराज जमीनीवर पडलें.

**हस्तामल**— ( आनंदानें ) शाबास, शाबास, मग कसें काय झालें?

**चिदाभासाचार्य**—त्यावेळीं सर्व दिवाणखाना गलबल्यानें भरून गेला. सर्व राजांगनाही प्रेतास कवटाळून विलाप करूं लागल्या. व " हें कृत्य गवईबुवाचें आहे. त्यांस धरा. पहातां काय?" इतके शब्द माझ्या कानीं पडतांच, आतां येथें राहिलों असतां आम्हांस चांगली बिदागी मिळेल, या भीतीनें आमच्या गुरुजीस खूण करून, योगशक्तीनें सूक्ष्म रूप घेऊन मी इकडे आलों. परंतु अद्यापी पद्मपाद कसे आलें नाहींत?

**हस्तामल**— ( घाबरून ) तर मग पद्मपाद त्यांच्या कोपदेवतेस बळी झाला कीं काय? अरेरे! आचार्य आतां आपल्या

पूर्वशरीरांत येतील, आणि ज्यानें एवढें साहस करून, आपणा पूर्व स्मरण दिलें, तो व्यर्थ प्राणांस मुकला असें कळतांच, त्यांस फारच वाईट वाटेल आतां काय करावें!

**चिदाभासाचार्य**—इतकें घाबरूंनका. बहुश ते आतां येतील आचार्यांची त्यांजवर पूर्ण कृपा असतां त्यास अपाय करण्यास कोण समर्थ आहे!

( इतक्यांत पडद्यांत मोठ्यानें नारायण, असा गजर होतो. तेव्हां सर्वही आनंदानें नारायण नामाचा गजर करितात. नंतर पद्मपादाचार्य प्रवेश करितात. )

**पद्मपाद०**—मित्रहो तिकडील सर्व वर्तमान, चिदाभासाचार्यांच्या मुखें तुम्हांस कळलेंच असेल.

**हस्तामल०**—हो हो. कळलें. परंतु, तुह्मी कां आला नाहीं, म्हणून आम्हीं भयग्रस्त झालों होतों.

**पद्मपाद**—आतां गलबला करूं नका. आचार्यांची स्वारी आपल्या पूर्व शरिरांत आतां येईल.

( सर्व आचार्यांच्या कलेवराकडे दृष्टी लावितात. तों हळु हळु प्राण संचार होऊन आचार्य उठून बसतात तोंच सर्व शिष्य नारायणनामाचा गजर करितात. )

**शंकराचार्य**—( मोठ्या आनंदानें ) शिष्यवर्गांनो, विषयमोह परम कठीण आहे, ज्याणें मराही विस्मरण पाडिलें, ह्मणून तुम्हांस परम श्रम झाले असतील. अस्तु. आतां विलंब नको. मंडन आमची मार्गप्रतीक्षा करीत असेल, यास्तव तिकडे जाऊन, सरस्वतीस उत्तरें देऊन मंडनास संन्याशी करूं, ने-

तर कर्तव्य पुष्कळ आहे. चला तर सर्व. ( असें झाल्याव नारायण नारायण करित सर्वत्र निघून जातात. )

## प्रवेश ७.

### (स्थळ—माहिष्मती नगरींतील मंडनाचें गृह)

( तदनंतर मंडनमिश्र व सरस्वती प्रवेश करितात. )

**सरस्वती**—( हात जोडून ) महाराज आपण त्या यतीशीं वाद करून पराभूत झाल्या दिवसा पासून, मजशीं पूर्वी प्रमाणें शुद्ध अंतःकरणानें वागत नाहीं, व पूर्वी प्रमाणें विलासादिकांत आपलें मनही नाहीं, तसेंच तुम्हांस परमप्रिय जें स्नानसंध्यादिकर्म, तें करण्यासही उत्सुकता नाहीं तर असें एकदम होण्याचें कारण कायबरें ?

**मंडनमिश्र**—( हंसून ) प्रिये ज्याला खऱ्या तत्वाची ओळख झाली, तो संसारिकांच्या डोळ्यांस वेडाच दिसतो, यांत आश्चर्य नाहीं. आणि तशांतून ज्या दयाळू सद्गुरुंनी मला हें ज्ञान दिलें, त्यांची परत येण्याची अवधी टळून गेल्या कारणानें माझें सर्व लक्ष तिकडे आहे.

**सरस्वती**—( भयानें ) प्राणवल्लभा, एकून तो घातकी संन्यास घेण्याचा आपला निश्चय जो एकवार झाला, तो अद्यापीं तसाच आहे काय !

**मंडनमिश्र**—यांत काय संशय ! प्रिये, नश्वर इंद्रियगणांनीं आरोपित जो संसारभास त्यांतील मिथ्यासुखाला, तथा

त्या सद्गुरूंच्या मुखांतील बोधामृत प्राशन केल्यानंतर, हा कैसा लुब्ध होईल बरें ?

( इतक्यांत पडद्यांत नारायणध्वनी होतो. )

**सरस्वती**—( ऐकून ) अगबाई, माझ्या पतीचा आणि माझा संबंध तोडणारा यती आला; असें वाटतें.

( नंतर सर्व शिष्यांसह शंकराचार्य प्रवेश करितात, मंडन व सरस्वती त्यांस अभिवंदन करितात. )

**शंकराचार्य**—( सरस्वतीकडे तोंड करून ) अगे सरस्वती, आतां कामशास्त्रांतील काय प्रश्न करणें असतील ते कर.

**सरस्वती**—[ पुनः वंदन करून ) महाराज मला सर्व उत्तरें पोहोंचलीं. हे परमेश्वरा, तूं सर्व विद्येचा समुद्र आहेस, हें मला ठाऊक होतें. परंतु, स्त्रियांनीं पती करितां कसें असावें, हें प्रसिद्ध करण्या करितां मी तसले प्रश्न केले. परंतु, भगवंता आपल्या विद्येची परीक्षा करण्या करितां केले नाहींत. भोआचार्या, हे पती आपल्या स्वाधीन केले आहेत. त्यांनां त्यांच्या इच्छेप्रमाणें सन्यास द्यावा. मी आतां सत्यलोकांस जातें. कारण, " मृत्युलोकीं जन्म घ्यावा " असा मला शाप झाला असून, " तुझ्या पतीस वादांत जिंकून जेव्हां कोणी सन्यास देईल, तेव्हां तूं आपलें पूर्वरूप पावून आपल्या पदास येशील. " असा उःशापही झाला होता. तस्मात हे जगद्गुरो, आतां मला जाण्याची आज्ञा असावी. [ असें म्हणून पुनः नमस्कार करिते. )

**शंकराचार्य**—( मोठ्या आनंदानें ) सरस्वती, सत्यलोकास जाण्यास तुला मी आज्ञा देतनाहीं. कारण माझा मुख्य मठ ऋष्यशृंगपुर येथें होईल, त्या ठिकाणीं तुझा पूर्णवास, माझें हें अद्वैत मत या लोकीं जों पर्यंत चालेल, तों पर्यंत असला पाहिजे.

आणि त्या पीठावर शिष्य परंपरेनें जे जे बसतील, त्यांस तूं विद्वान केलें पाहिजेस.

**सरस्वती**—महाराज, आपली आज्ञा उल्लंघन करण्याचें मला सामर्थ्य नाहींच, तेव्हां आपल्या इच्छेप्रमाणें ऋष्यशृंगपुरमठांत वास करण्याकरितां गमन करितें. आज्ञा असावी.

**शंकराचार्य**—हे देवी, माझे अनुयायी जजे माझा अधिकार चालवितील, ते ते तुझी आराधना व सेवा चांगली करितील, व तुझा मोठा सन्मान ठेवतील.

**सरस्वती**—आतां मी अदृश्य होतें. [ असें ह्मणून निघून जाते. )

**मंडनामिश्र**—( आचार्यांच्या चरणी मस्तक ठेऊन ) सद्गुरो, आतां मला संन्यास देऊन पावन करा.

**शंकराचार्य**—( आनंदानें ) ठीक आहे, आतां तेंच कर्तव्य. ( चिदाभासाकडे वळून ) चिदाभासा, ह्या मंडनास घेऊन जाऊन, त्याजकडून मुंडनादि सर्व विधी करीव. तोंपर्यंत मीही येतों.

**चिदाभास**०—आज्ञा गुरुवर्य. ( असें म्हणून मंडनासह निघून जातो. )

**शंकराचार्य**—[ पद्मपादाकडे वळून ] पद्मपादा, एकतर मोठेंच काम झालें. कारण, सकल कर्ममार्गाचा सार्वभौम जो मंडन त्यास तर शिष्य करून घेतलेंच. आतां दिग्विजयास निघावें, अशी माझी इच्छा आहे.

**पद्मपाद**०—महाराज, त्यांत काय अवघड आहे ? मंडनास शिष्यकरून घेऊन निघालें म्हणजे झालें.

**शंकराचार्य**—तसें नव्हे. दिग्विजय राजबलावांचून सांग

झाले नाहीं कारण, वादानें जिंकिलें असून जे न ऐकतील त्या स दंडच केला पाहिजे. तस्मात् तूं सुधन्व्या कडे जाऊन, त्यास ही माझी आज्ञा सांगून, चातुरंग सैन्यासह येथें घेऊन यावें. तों पर्यंत आम्हीं येथेंच आहों. मात्र कार्य करून लवकर यावेंस.

**पद्मपाद**—महाराज, आज्ञेप्रमाणें, सर्व सैन्यासह राजा सुधन्व्यास घेऊन येतों. ( असें ह्मणून निघून जातो. )

**शंकराचार्य**—( इतर शिष्यांस ) चला आतां मंडनास संन्यासदीक्षा देण्याकरितां जाऊं. [ असें झाल्यावर नारायण नारायण करीत सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश ८.

### (स्थळ—केरळ देशांतील आचार्यांचें जन्मस्थान)

[ तदनंतर बिछान्यावर मुमूर्षु झालेली शंकराचार्यांची माता आर्याअंबा प्रवेश करिते. ]

**अंबाबाई**—[ निजली आहे तशीच दुःखानें ] परमेश्वरा दीनदयाळा, गात्रें परस्वाधीन झाली ह्मणजे माझ्या सारिख्या अनाथ प्राण्याला वाचूं देणें हा तुझा मोठा अन्याय आहे. भगवंता, सर्व जगांतील अज्ञानांधकार घालविण्याकरितां जो केवळ ज्ञानाचा सूर्यच, अशा पुत्राला मी प्रसवलें असून, देवा अंतकाळीं माझ्या तोंडांत पाणी घालण्यास देखील कोणी नसावें काय ? अहारे पुत्रा ! तुझे गुण किती तरी मी वर्णूं!

माझेंच भाग्य कमी म्हणून तुझी संगती मला फार दिवस झाली नाहीं. आतां या वेळीं कोठें असशील ! माझा अंतकाळ जवळ आला आहे, तर एक वार तुझें मुख पाहून प्राण सोडावे अशी इच्छा आहे. दुसरें कांहीं नाहीं.

[ इतक्यांत योगमार्गें शंकराचार्य प्रवेश करितात. ]

**शंकराचार्य**--[ माता पडली होती तेथें जाऊन दुःखानें.] अरेरे ! जिणें नवमास ह्या देहाचें ओझें सोसून, पुढें अनेक दुःखें सहन करून, ह्याचें सांगोपन केलें ती ही माझी माता एकटी या कंथलावर पडलेली आहे काय ! [ मग तिच्याशीं भाषण करितात ] आई, हा तुझा संन्यस्त शंकरनामा पुत्र आला आहे तर डोळे उघडून याजकडे पाहा.

**अंबाबाई**—[ नेत्र उघडून पाहून ] बाळा शंकरा, केव्हां आला आहेस ? वत्सा, कुशल आहेसना ?

**शंकराचार्य**---आई ज्याला कधींही अपाय व्हावयाचा नाहीं तो सदा कुशलच आहे. पण माते, तुझी अशी अवस्था झाली असून तुजजवळ आमच्या भाऊबंदांतून कोणीच नाहीं; हें कसें ?

**अंबाबाई**--बाळा, जिला पुत्रानेंही सोडिली, तिचा भाऊबंद प्रतिपाळ करितात काय ? सर्व वडिलार्जित संपत्ति नेण्यास मात्र एकवार ते आले होते, त्यावर ते इकडे मुळींच आले नाहींत. असो. आपल्याच प्रालब्धीं दुःखभोग असल्यावर दुसऱ्यास दोष देऊन फळ काय ?

**शंकराचार्य**—काय माते, मी सर्व द्रव्य त्यांस देऊन, तुझी व्यवस्था नीट ठेवण्यास त्यांस सांगितलें असून त्यांनीं तुजसी असें आचरण केलें काय ?

**अंबाबाई**--बाळा, जळो तें आतां. त्याची ह्या वेळीं मला स्मृतीही नको. परंतु आतां तुला शेवटचें एक सांगणें आहे. तें कोणचें म्हणशील तर एक:---वत्सा, तूं सर्व जगाचा उद्धार करितोस तद्वत् या तुझ्या मातेला मोकळी कर म्हणजे झालें.

**शंकराचार्य**--फार उत्तम आहे. आई तूं नेत्र झांक, म्हणजे तुला गणांसह विमान दिसेल, आणि तुला ते त्या विमानांत बसवून घेऊन जातील. आतां शिवध्यानाशिवाय दुसरें कांहीं मनांत आणूं नको. कारण हा तुझा अंतकाळ आहे.

**अंबाबाई**---( नेत्र झांकतें, व तिला विमान दिसतें, तोंच पुनः घाबरून डोळे उघडून ) बाळा शंकरा, त्या विमानांतून जाण्यास मला फार भीती वाटते. कारण, त्या विमानावर सर्व पिशाचगण आहेत; तेव्हां मला वैकुंठास पोहोंचीव. कारण तो भगवान नारायण मला फार आवडतो.

**शंकराचार्य**--( किंचित हंसून ) ठीक आहे. आई, पुनः नेत्र झांक म्हणजे तुला विष्णुगणयुक्त विमान दृष्टीस पडेल.

**अंबाबाई**---( पुनः नेत्र झांकते, व तिला विष्णुविमान दिसतें. त्यावेळीं आनंदानें ) आहाहा धन्य धन्य मी. काय ह्या विमानाचें वर्णन करूं ? ह्यावर जे विष्णुगण आहेत, ते सर्व चतुर्भुज, पीतांबरधारी, शंखचक्रगदापद्म धारण करणारे, मस्तकावर किरीट गळ्यांत वैजयंतीमाळा परिधान करणारे; तर आतां मी या विमानांतून जाणार काय ! वत्सा शंकरा, येतें मी आतां मजवर पूर्ण दया असूंदे. पुत्रा तूं महाविरक्त संन्याशी असतां, या अनाथ मातेवर दया करून आलास आणि मला उत्तम लोकास पाठविलेस, हे तुझे मजवर उपकार आहेत. अस्तु. आतां मी चाललें राम-राम-राम-( प्राण सोडिते. )

**शंकराचार्य**—( डोळ्यांस पाणी आणून) अरे मी महाविरक्त, सर्व हें दृश्य नश्वर असें जाणून अनुभव घेणारा, तशांतून हि-च्या ममत्वपाशांतून मी फार दिवस मुक्त असतां, ज्या पेक्षां मला ही मातृवियोगदु:खानें पोटांतून भडभडून येतें, त्या पेक्षां इतरांस हे दु:ख केवढें होत असेल ! असो आतां हिच्या पुढील कृत्याविषयीं आप्तांस सांगावें. [ असें म्हणून पडद्याकडे तोंड करून मोठया स्वरानें ) अहो ज्ञातिजानहो, हो शिवगुरूपंडिताची स्त्री महासाध्वी आर्याअंबा मृत्यु पावली; तर तिचा पुढील विधी करण्या करितां तरी तुह्मी सत्वर यावें.

( नंतर पडद्यांत शब्द होतो:– अरे दुष्टा अधमा तूं आमच्या वंशांत उत्पन्न होऊन, लोकद्वय विरुद्ध अशा मताचा स्वीकार करून, या विशुद्धकुलास कलंक लाविलास. तस्मात तुला प्रसवणारी स्त्री ही महापातकी आहे यास्तव तिच्या सार्थकास आम्हीं कोणी येणार नाहीं. तूं पाहिजे तें कर.

**शंकराचार्य**—( ऐकून कोपानें ) बांधवहो, जरी एखादा अनाथ मृत झाला तरी, त्याच्या दहनाविषयीं सर्व तत्पर असतात. आणि ही तर तुमच्या सापिंडांतील असून असें निष्ठुर उत्तर काय ! अस्तु, मला अग्नी तरी द्या म्हणजे, जरी मला ( संन्याशाला ) अधिकार नाहीं, तरी माझ्या मातेचें प्रेत मी दहन करितों.

( पुन: पडद्यांत शब्द होतो. अरे अधमा, अशा अपवित्र स्त्रियेच्या प्रेतदहनास आमचा अग्नी आम्हीं कधींही देणार नाहीं. पाहिजे तर तू शूद्राच्या येथून अग्नी आण आणि दहन कर. )

**शंकराचार्य**--[ ऐकून ] हर हर ! देवा, हे मनुष्य असतील

काय ! ( पुनः पड्याकडे तोंड करून ) तुम्हांला ब्राम्हण्याचाच कंटाळा आला आहे त्यास तुम्हीं काय कराल ! ( आपणाशीं ) आतां मातेचें शव अंगणांत नेऊन, गृहांतील काष्ठें रचून त्यावर ठेवितों. आणि तिचाच दक्षिणबाहू मंथन करून अग्नि उत्पन्न करून, गृहद्वारांतच दहन करितों. ( असें म्हणून आर्यांअंबेचा देह आत घेऊन जातात. व पुनः बाहेर येऊन मोठ्या स्वरानें ) भो बांधवहो आतां माझें भाषण ऐकावें:– आज पासून तुमचें स्मशान तुमच्या गृहद्वारांतच होईल. व तुम्हीं सर्व वेदबाह्य होऊन शूद्रवत आचार कराल. व तुम्हांस विधियुक्त अग्नी मिळणार नाहीं. सारांश येथील तुम्हीं सर्व ब्राम्हण, ह्या पातका बद्दल, आज पासून ब्राम्हण्यांतून नष्ट व्हाल, हा तुम्हांस माझा शाप आहे. ( मग आपल्याशीं ) आतां येथें राहून काय कर्तव्य आहे ? आपल्या कार्यांत जावें ( असें म्हणून निघून जातात. )

---

## प्रवेश. ९

### [ स्थळ—काशीक्षेत्रांतील स्मशानभूमी ]

( तदनंतर शिवगण जटाधर प्रवेश करितो. )

**जटाधर**—( आपणाशीं ) मला गिरिजामातेची आज्ञा आहे कीं, श्री शंकराचार्यांचें चरित्र, जसजसें या मृत्युलोकीं होईल, तसतसें कैलाशीं येऊन निवेदन करावें. तर मीं, आज्ञे प्रमाणें, मला जितकें कळलें होतें तितकें जाऊन कळविलें आणि पुढील वर्तमान समजून घेण्याकरितां माझा मित्र पिंगाक्ष यास तिकडे पाठविलें आहे, व त्याचा आणि माझा ह्या काशींतील स्मशान

भूमिकेंत जमण्याचा संकेत आहे, त्या प्रमाणें मी तर ह्या ठिकाणी आलों; पण अद्यापी माझा मित्र कसा बरें आला नाहीं?

( तदनंतर पिंगाक्षगण प्रवेश करितो. )

**पिंगाक्ष**—( हिकडे तिकडे हिंडून, जटाधरास पाहून ) अरे हा माझा परम प्रिय मित्र, संकेताप्रमाणें ह्या स्थळीं आहेच, तर मग त्यास भेटावें. ( जवळ येऊन ) मित्रा जटाधरा, नमोनमः.

**जटाधर**—( त्यास पाहून संतोषानें ) नमो नमः कां मित्रा पिंगाक्षा, कुशल आहेसना ?

**पिंगाक्ष**—सख्या, त्या परम कारुणिक भगवंतांचें चरितामृत प्राशन करीत असतां अकुशलत्वाचें वारें तरी लागेल काय ? काय सांगू मित्रा, त्या सद्गुरूच्या लीला अवलोकन करीत असतां, वर्षेही क्षणांप्रमाणें गेलीं.

**जटाधर**—बरें मित्रा, तिकडील वर्तमान सांग. ह्मणजे ता. त्काळ जाऊन मातोश्रीस कळविण्यास ठीक पडेल.

**पिंगाक्ष**—पण आधीं मातोश्रीस कोठेपर्यंत वर्तमान कळलें आ. हे ? हें सांग, म्हणजे पुढचें सर्व सांगतों.

**जटाधर**—आचार्यांनीं दिग्विजय करण्याचें मनांत आणून, राजासुधन्व्यास बोलावूं पाठविलें. येथपर्यंत सर्व वर्तमान मातोश्रीस मींच कळविलें आहे. आतां पुढील काय तें सांग म्हणजे झालें.

**पिंगाक्ष**—ऐक तरः— आचार्य, आपल्या मातोश्रीस वैकुं. ठास पाठवून, मंडनमिश्रादि सर्व शिष्यांसमवेत, राजासुधन्व्याचें चातुरंग सैन्य बरोबर घेऊन, मोठया समारंभानें दिग्विजयास निघाले, ते प्रथम श्रीरामेश्वरास जातांना, वाटेंत शाक्तिक होते त्यांच्या मताचा विध्वंस करून, नतर रामनाथास गेले. तेथून चोल, द्रविड, पांडय इत्यादि देश जिंकून, कांचिपुरीस गेले. व

तेथील सर्व पंडिताचा गर्व नाहींसा करून, वेंकुंठाचलास आले. आणि तेथील जनांस पादाक्रांत करून, कर्नाटकाप्रत येते झाले.

**जटाधर**—नंतर काय झालें ?

**पिंगाक्ष**—त्या ठिकाणीं भैरवदीक्षा धारण करणारा, ककच नांवाचा कापालिक, आपल्या मोठया समुदायासह वास्तव्य करीत होता. तो आचार्यांसमक्ष येऊन दुर्भाषणें करूं लागला. त्या वेळीं राजासुधन्व्यास कोप येऊन, त्यानें त्या दुष्टास सभेंतून घालवून दिलें. तेव्हां तो क्रूर, असा अपमान होतांच, सर्व आपले अनुयायी कापालिक मिळवून युद्धास तयार झाला.

**जटाधर**—( चकित होऊन ) कायहो दुष्टाचें साहस तरी पहा मग !

**पिंगाक्ष**—नंतर सुधन्व्याच्या सैन्याशीं त्या कापालिकाचें युद्ध चाललें असतां, बाकीच्या कापालिकांनीं, आचार्यांच्या धर्ममठांत खुशाल भोजन करून कालक्षेप करणाऱ्या विप्रांवर चाल करून, अनेक ब्राम्हणांस यमलोकांस पाठविलें. मग काय विचारतां ! जिकडे तिकडे हाहाकार होऊन गेला. सर्व विप्र नागडे उघडे रूदन करीत आचार्यांपाशीं येऊन जीवदान मागूं लागले.

**जटाधर**—कायहो चांडाळानें अनर्थ केला हा ! नंतर कसें काय झालें ?

**पिंगाक्ष**—नंतर त्या दयापयोनिधीच्या चित्तसमुद्रावर प्रथमतः कृपेच्या लहरी आल्या, आणि मागून त्या दुष्टाच्या आचरणानें अतिशय संतप्त होऊन, आचार्य स्वतः संग्रामभूमीवर आले, आणि एका हुंकारानेंच सर्व कापालिकांचें भस्म करिते झाले. त्या वेळीं तो ककच मात्र एकटा अवशेष राहिला. तो, आपल्या मंत्र सामर्थ्यें श्रीभैरवदेवास उत्पन्न करून, आचार्यांचा नाश करण्यास त्यास सांगता झाला.

**जटाधर**--( घाबरून ) नंतर काय झालें ? आचार्य त्या संकटांतून मुक्त झाले कीं नाहीं ?

**पिंगाक्ष**--मित्रा घाबरूं नको. त्या भैरवानें आचार्यांकडे अवलोकन करून हास्य केलें. आणि फिरून त्या दुष्टाकडे, कल्पांतानलज्वालांनीं युक्त दृष्टीनें अवलोकन करून भाषण करूं कीं " अरे मदांधा, माझाच अवतार जो हा भाष्यकार, त्याचा नाश करण्यास सांगतोस काय ! तर मग तुलाच आतां ठेवीत नाहीं. " असें म्हणून त्या उग्र भैरवानें मत्त हस्ती जसा आपल्या शुंडाग्रानें कमलपुष्प सहज तोडितो, तद्वत त्या नीच कापालिकाचें शिरकमळ तोडिलें. आणि तो ईश्वर आचार्यास आशिर्वाद देऊन, अंतर्धान पावता झाला.

**जटाधर**—( संतोष पावून ] मित्रा आतां काळजीतून मुक्त झालों. नंतर पुढें काय झालें !

**पिंगाक्ष**-- नंतर आचार्य, पश्चिमसमुद्राकडे वळून गोकर्णास आले. तेथें नीलकंठ पंडितांशीं वाद करून, त्यास जिंकून द्वारकेस गेले. त्या ठिकाणीं कितीएक विष्णुपाखांडी होते त्यास स्ववश करून घेऊन, आवंतीनगरीस येऊन पोंहोचले. तेथें भास्करपंडितांशीं मोठा वाद करून त्यासही पादाक्रांत करून सोडिलें. नंतर अभिनवगुप्त नामें महामांत्रिक आला, त्याचाही गर्व परिहार करूम, उत्तरे कडील देश जिंकण्यास निघाले.

**जटाधर**—बरें मग काय झालें !

**पिंगाक्ष**—नंतर कोसल देश, अंग देश, आदिकरून जिंकून, गौड देशात येऊन, तेथें मीमांसाशास्त्रपारंगत जो मुरारि मिश्रपंडित त्यासही जिंकिते झाले.

**जटाधर**—मित्रा, धन्य तूं. त्या परम मंगलाचें दिग्विजय

चरित्र अवलोकन करून, पवित्र झालोंस. बरें पुढें मग ?

**पिंगाक्ष**—नंतर आचार्य, आपल्या समुदायासह उत्तरे कडे असतां, ज्या अभिनवगुप्तपंडितांचा आचार्यांनीं मोड केला होता, त्यानें मंत्र सामर्थ्यें आचार्यांवर कृत्या सोडिली. तिच्या योगें आचार्यांस मोठा दुःसह भगंदर रोग उत्पन्न झाला.

**जटाधर**—( घाबरून ). मित्रा, हें मोठेंच संकट आलें तर बरें मग ?

**पिंगाक्ष**—नंतर, जरी आचार्य औषधी उपचार नकोत. " हें कलेवर भोगायतन आहे. " असें म्हणत होते, तरी सर्व शिष्यांनीं व राजासुधन्व्यानें अनेक राजवैद्य आणवून चिकित्सा करविल्या, परंतु कोणांसही त्या रोगाचें निदान होईना. शेवटीं पद्मपादाचार्यांनीं, अश्विनीकुमारांचें आवाहन करून, त्यांस मुर्तिमंत आणविलें. त्यांनीं रोगाची परीक्षा करून, " हा रोग कृत्येपासून आहे. " असें सांगून, ते देव अंतर्धान पावते झाले.

**जटाधर**—नंतर काय झालें ! आचार्य त्या रोगापासून मुक्त झाले कीं नाहीं ? हें सांग.

**पिंगाक्ष**—नंतर पद्मपादास कोप येऊन, त्याणीं आपल्या मंत्रबळें ती कृत्यां फिरविली, तोंच आचार्य नीट होऊन त्या कृत्यायोगें तो दुष्ट अभिनवगुप्त प्राणांस मुकला.

**जटाधर**—( आनंदानें ) शांत झालों आतां. मग पुढें काय झालें ?

**पिंगाक्ष**—नंतर एक दिवस गंगातीरीं आचार्य शिष्यांस भाष्यपाठ सांगत असतां आचार्यांचे परमगुरू गौडपादाचार्य हे आले; व आचार्यांचे भाष्यादि सर्व ग्रंथ पाहून, प्रसन्न होऊन, जाते झाले. नंतर, " काश्मीरगृहांत शारस्वतीचें वि-

द्याभद्रासन नामक पीठ आहे. व त्यावर जो आरोहण करील, त्यानेच दिग्विजय सांग केला. व तेथें मोठमोठे अनेक वादी आहेत." इत्यादि वर्तमान आचार्यांनीं ऐकिलें. त्या वेळीं आचार्य, आपल्या परिवारासह काश्मीराप्रत जाते झाले.

**जटाधर**—नंतर काय झालें ?

**पिंगाक्ष**—त्या काश्मीराच्या दक्षिणद्वारावर आचार्यांची स्वारी शिबिकेंत बसून, मोठ्या समारंभानें आली. तेथें काणाद, नैय्यायिक, कापालिक, सौगत, दिगंबर, जैमिनेय, असे वादी अनुक्रमें येऊन, आचार्यांस प्रश्न करिते झाले. त्या वेळीं त्या सर्वांचीं उत्तरें आचार्यांनीं समर्पक देतांच, हा सर्वज्ञ, सर्वशक्ती, ईश्वर आहे, अशी त्यांची खात्री होऊन काश्मीरवासीजनांनीं आचार्यांच्या मताचा स्वीकार केला; व आचार्यांस मोठ्या उत्साहानें मिरवीत नेऊन, विद्याभद्रासनपीठावर बसवावें, असें ठरवून, आचार्यांच्या सन्मानार्थ दिवादीप प्रज्वलीत करून, छत्रचामरायलंकृत शिबिकेंत आचार्यांस बसवून, अनेक वाद्यांचा गजर करीत आचार्यांची स्वारी चालविली. मित्रा, इतकें मी पाहून आलों. तूर्त आचार्यांची स्वारी त्या विद्याभद्रासनावर बसण्याकरितां मोठ्या समारंभानें निघाली आहे.

**जटाधर**—मित्रा, तर मीं हें वर्तमान मातोश्रीस सांगण्याकरितां कैलाशीं जातों. व तूंही पुढें काय होतें हें पहाण्यास जा.

( असें झाल्यावर उभयता निघून जातात. )



# प्रवेश १०.

## ( स्थळ—काश्मीर )

[ तदनंतर पडद्यांत नानाविध वाद्यें वाजतात. व वैतालिकाचा शब्द होतो—श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्य पदवाक्यप्रमाणपारावारपारीण यमनियमासनप्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टांगयोगानुष्ठाननिष्ठतपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्नगुरुपरंपराप्राप्तषड्दर्शनसंस्थापनाचार्य व्याख्यानसिंहासनाधीश्वर सकलनिगमागमसारहृदय सांख्यत्रयप्रतिपादक वैदिकमार्गप्रवर्तकसर्वतंत्रस्वतंत्र नास्तिकद्वैतध्वांतकदंबज्ञानमार्तंड बोधाब्जविभाकर श्रीराजाधिराज विद्याशंकराचार्य, जगद्गुरुमहाराज ]

( तदनंतर शिबिकेंत बसलेले श्रीशंकराचार्य, व पुढे बिरुदप्रबंध ह्मणणारा वैतालिक, व शिबिकेसन्निध चालणारे सर्व आचार्यशिष्य, व चातुरंगसैन्यासह हस्तांत आचार्यांच्या पादुका घेऊन राजासुधन्वा, व गांवांतील सर्व पंडित असे प्रवेश करितात. )

**वैतालिक**—( पुनः पूर्वोक्त श्रीमत्परमहंस॰ इत्यादि बिरुद पठण करितो. )

**राजा सुधन्वा**—( शिबिके जवळ जाऊन ) जगद्गुरु महाराज, सरस्वतीचें विद्याभद्रासन असलेलें हेंच तें मंदिर तर आतां शिबिकेंतून उतरावें.

( नंतर शिबिका खालीं ठेवितात. व आचार्य पद्मपादाचार्यांच्या हातास धरून बाहेर येतात. तोंच राजासुधन्वा पादुका पुढें करितो, त्या घालून आचार्य चालूं लागतात; त्यावेळीं अनेक वाद्यें वाजतात, व वैतालिक पुनः पुर्वोक्त बिरुद पठण करितो. )

**शंकराचार्य**--( विद्याभद्रासनाजवळ जाऊन ) पद्मपादा, ज्या पीठावर आरोहण केलें असतां सर्व दिग्विजय केला, असें होतें, तेंच हें विद्याभद्रासनपीठ काय ?

**पद्मपाद**--सद्गुरो, हेंच तें पीठ आतां यावर आपण आरोहण करावें.

**शंकराचार्य**--फारउत्तम. ( असें म्हणून पद्मपादाचार्यांच्या हस्ताचें अवलंबन करून वर चढावयास जातात, तोंच अतंरिक्षांतून सरस्वतीचा शब्द होतो.

[ अरे हे शंकराचार्या, या पीठावर जो सर्वज्ञ आणि शुचिर्भूत असेल तोच बसण्यास योग्य आहे. आतां तूं सर्वज्ञ आहेस म्हणण्यासविषयीं संशय नाहींच. कारण, ब्रम्हदेवताचा अवतार जे मंडनमिश्र तोही तुझा शिष्य झाला आहे परंतु, तूं शुचिर्भूत नाहींस. कारण, तूं यती असतां स्त्रियांशीं विलास केला आहेस. ह्या करितां, या पीठावर बसण्यास तूं योग्य नाहींस. )

**शंकराचार्य**--( ऐकून कांपानें ].सरस्वती, तुझ्या गर्वांच मीं एकवार मोचन केलें असतां पुनरपि या प्रसंगींही माझ्या पीठारोहास प्रतिबंधकारितेस काय ? अस्तु, तुला याचेंही उत्तर देतों ऐक:—हे वाग्देवी. मी ज्या देहानें यापीठावर बसतों, तो माझा देह पवित्रच आहे; व ज्या देहानें मीं स्त्री विलास केले. तो देह चितेंत भस्म झाला. तशांतून शुद्धता आणी अशुद्धतार ह्यांचा संपर्क आत्म्यास नाहींच. तो देहास आहे. पाहा- यास उदाहरण:—पूर्वजन्मीं एखादा चांडाल जातीचा असून कांहीं पुण्यबळें अन्य जन्मीं तो विप्र होतो, म्हणून, पूर्वजन्मीं चांडाल होता. एवढ्यावरूनच त्यास वेदाधिकार नाहींकीं काय ? तस्मात ह्या अतिपवित्र देहानें, या पीठावर आरोहण करण्यास मला

कांहीं प्रत्यशाय दिसत नाहीं.. पण यावर तुला आणखी काय बोलणें असेल तें बोल.

(यावर सरस्वती निरुत्तर होते. व आचार्य त्या पीठावरचढून बसतात. त्या काळीं मोठा वाद्यांचा गजर होतो, व आचार्यांवर पुष्पवृष्टी होते. व सर्व काश्मीरवासी पंडित येऊन आचार्यांची अग्रपूजा करितात.)

**राजा सुधन्वा**—( पुढें होऊन, वरहात करून मोठ्या स्वरानें )तथैत्रानीं माझें भाषण श्रवण करावें:—अहो सभासद्हो, ज्यादेवाधिदेवानें, प्रथमतः भट्टपादा कडून जैनांचा पराभव करवून त्यांचें निर्बीज करविलें. व ज्यानें आपल्या इच्छाघलें याभूमंडलावर मंडनादि पंडिता कडून कर्ममार्गप्रवर्ती करविली व ज्यानें शिवगुरूपंडितांच्या उदरी जन्म घेऊन अनेक चमत्कार केले, व ज्यानें मायानक उत्पन्न करून माते पासून सन्यासा विषयीं आज्ञा मिळविली, व ज्यानें श्रीगोवींदपुज्यपादाचार्या पासून संन्यास घेऊन काशींपुरींत शिवाचें प्रत्यक्ष दर्शन घेतलें व ज्यानें मंडनमिश्राशीं अगाध वाद करून सरस्वतीस जिंकण्या करितां परकायाप्रवेश केला, व ज्यानें दिग्विजय करून सर्व पंडितांस पादक्रांतकेलं, तो हा भगवान कैलासनाथ, सांप्रतच्या विद्याभद्रासनावर आरोहण करून नक्षत्रसमाजांत शरच्चंद्रा प्रमाणें शोभतो आहे. ( असें म्हणून पीठासमोर साष्टांग प्रणिपात घालतो. )

**शंकराचार्य**—( मोठयानें नारायण असें म्हणून ) शिष्यवर्गांनो, माझें अवतारकृत्य आज सांग झालें, आतां तुम्हांस माझी आज्ञा आहे कीं माझें चारदिशेस चार मुख्य मठ होतील, तेथें तुम्हीं वास्तव्य करून, शिष्यपरंपरेनें माझा हा अद्वैतसांप्रदाय वाढवून, सर्व जनांकडून हा वैदिकमार्ग चालवावा. व जे दुराचार

करितील, त्यास दंड करून, सन्मार्गप्रवर्तकावर अनुग्रह करावा; व जरी यतीस वैभव वर्ज्य आहे, तरी, सर्व जनांवर वर्चस्व ठेवण्याकरितां तुम्हीं राजैश्वर्याचा स्वीकार करावा. परंतु, त्या वैभवापासून आनंद न मानितां, केवळ आत्मानंद निमग्न असून सर्व जगाचा उद्धार करावा. आतां माझें आयुष्यही थोडें उरलें, या करितां मी हिमाचलावर जाऊन, तेथून निजधामास गमन करितों. ( सुधन्व्यास जवळ बोलावून ) भो भूपते, तूं ह्या कृत्यास अति सहाय्य केलेंस, वास्तव तुझाही उद्धार होईल. आतां माझ्या आज्ञेप्रमाणें माझ्या शिष्यांस तुझेंही साहाय्य असलें पाहिजे.

**राजासुधन्वा**—( पुन: नमस्कार करून ) सद्गुरो, आपण कृपा करून, याकडून सेवा घेतली, यांत मजकडे कांहीं नाहीं. सर्व सामर्थ्य आपलें आहे. आतां आज्ञेप्रमाणें आपल्या चारी मठास संस्थानें वगैरे करून देऊन हा सांप्रदाय अव्याहत चालवितों.

**शंकराचार्य**—झालें तर सर्वत्रांनीं आतां आपापल्या उद्यागास जावें. आणि आजपासून ह्या माझ्या ऐश्वर्याचा उपभोग पद्मपादानें घ्यावा. [ असें झाल्यावर सर्वत्र नमस्कार करून निघून जातात. व आचार्यही गमन करितात. )

---

## प्रवेश ११.

### ( स्थळ—हिमाचल )

( तदनंतर नारायण, नारायण करीत श्रीशंकराचार्य प्रवेश करितात. )

**शंकराचार्य**—( आपणाशींच ) मीं तर ईशाज्ञेप्रमाणें सर्व

अवतारचरित्र सांग करून कृतकृत्य झालों. व माझ्या वयाची बत्तीस वर्षेही पूर्ण झालीं. तर आतां या गुहेंत प्रवेश करून नंतर निजधामास जावें. ( असें म्हणून नारायणध्वनी करीत गुहेंत प्रवेश करितात. )

( तदनंतर ब्रम्हदेव, इंद्र आदिकरून देवता प्रवेश करितात. )

**इंद्र**--भो कमळासनगुरो, श्रीशंकराचार्यांचें अवतारकृत्य समाप्त झालें म्हणून, त्यांस निजधामास सन्मानानें नेण्यास, आम्हीं सर्वत्र आलो आहों. व ते आचार्य या हिमाचळाच्या गुहेंत आहेत असें आपण अंतर्दृष्टीनें जाणिलेंत. तस्मात आतां आपणच पुढे होऊन, त्यांस निवेदन करावें.

**ब्रह्मदेव**--( गुहेच्या मुखाशीं जाऊन हात जोडून ) भो देवाधिदेव जगन्निवास पार्वतीवल्लभ, आपण सर्व देवतेस व सर्व जनांस सुख देण्याकरितां, मनुष्यरूप धरून अनेक लीला करून, सर्व मान्य मताचें स्थापन केलें. व आपल्या बोधप्रकाशानें या जगांतील सर्व अज्ञानतिमिर नाहींसें केलें. तस्मात आतां आपलें अवशिष्ट कर्तव्य काहीं राहिलें नाहीं. यास्तव आतां निजधामास चलावें. भगवन आज वैशाख शुक्ल पौर्णिमा आहे, तेव्हां आपण कैलासास जाण्याचा हाच दिवस नियमित झाला आहे.

[ तदनंतर गुहतून शंकराचार्यांचा शब्द होतो;-ब्रम्हायमहो, आजच्या दिनीं माझ्या आयुष्याचा अंत झाला. हें जाणूनच मी गुहाप्रवेश केला आहे. आतां कैलासास जाण्याकरितां, ह्याच देहास माझें मूळस्वरूप देऊन, येतों. कारण हा देह या मृत्युलोकीं ठेवणें नाहीं. ]

**ब्रह्मदेव**—तथास्तु. महाराज, आपण सदाशिवच आहां. मायायोगें मनुष्यरूपी दिसत होता. तस्मात आपलें मूळस्वरूप

घेऊन, आतां बाहेर यावें. हे सर्व देव आपल्या दर्शना विषयीं उत्सुक झाले आहेत.

( तदनंतर शिवस्वरूप धारण करून श्रीशंकराचार्य प्रवेश करितात. त्या वेळीं स्वर्गांत दुंदुभी वाजतात. व पुष्पवृष्टी होते. व सर्व देव त्यांस नमस्कार करितात. )

शंकराचार्य—( हास्यमुख करून ) देवतेनो, तुमची सर्व चिंता दुर झालीना ?

इंद्र—कैलासनाथ, आपण आम्हांकरितां, एवढे श्रम घेतल्यावर आमचे मनोरथ पूर्ण झाल्यावांचून कसे रहातील ? महाराज, आपण स्थापित केलेलें मत, सर्व शिष्यांस मान्य होऊन, या मृत्युलोकीं चिरकाळ राहील. असा आम्हीं सर्व देवतां मिळून आपल्या मतास आशिर्वाद देतों.

शंकराचार्य—अमरगणहो, आज मला परम संतोष झाला आहे, तर ह्या प्रसंगी तुमची जी इच्छा असेल ती सांगा. ह्मणजे तात्काळ पूर्ण करितों.

ब्रह्मदेव—महाराज, आपल्या लिलायोगें आमचे सर्व मनोरथ पूर्ण झालेच. परंतु, शेवटीं हें भरद्वाक्य असो.

॥ श्लोक ॥

॥ कालीं पर्जन्य पावो. सुपथ, जनमनश्चातकां मेघ होवो ॥
॥ विद्या वृद्धीस जावो. नृपति जयदयाशांतिदाक्षिण्य सेवो ॥
॥ श्रीद श्रीलाहि देवो. सुकविस कवितापूर्णचातुर्य येवो ॥
॥ अज्ञाना बोध व्हावो तव भजक सदा सर्व सौख्यांसि
॥ घेवो ॥ १ ॥

शंकराचार्य---( प्रसन्न मुद्रेनें ) तथास्तु. हेंही होईल चला तर सर्वही आपापल्या लोकांस जाऊं ( असें झाल्यावर सर्वत्र निघून जातात. )

शृंगारखनुभवदिग्विजयपुरःसर निजधामगमनोनाम

पांचवा अंक समाप्त

श्री

सच्चिदानंद परमेश्वरार्पण मस्तु.

